

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

वर्ष ८
अंक - २८

# नवी क्षितिजे

अस्तित्ववाद (१९)

विश्वास पाटील.

कि. ८ रुपये

अनुक्रमणिका



वर्ष सातवे

२९

जा. फे. मा. ७६




संपादक
नाना जोशी
विश्वास पाटील

रचना
पामार्ट
मुंबई २८

पत्र व्यवहाराचा पत्ता
विश्वास पाटील
पुष्प कुंज, पालखी वाडी
१३, काशीनाथ धुरु रोड मुंबई २८

मुद्रक व प्रकाशक
शुभांगी जोशी
३२९ वि. प. रोड मुंबई ४

वार्षिक वर्गणी
रु. १२-५०

या अंकाची
किंमत रु. ५

मालक : सौ. शुभांगी जोशी
३२९, वि. प. रोड, मुंबई ४

मुद्रण स्थळ :
विमा मुद्रक आणि प्रकाशक लि.,
सातारा, यांचा विमा छापखाना.
४१५ ००२

# अनुक्रमणिका

तत्त्वज्ञान







# संपादकीय :

नवी क्षितिजेचा हा एकोणतिसावा अंक. या अंकाबरोबर नवी क्षितिजे आठव्या वर्षात पदार्पण करीत आहे.

याही अंकात अस्तित्ववाद–नित्शे हाच लेख चालू ठेवला आहे. या लेखाची उरलेली थोडी पाने पुढील म्हणजे तिसाव्या अंकात पुरी होतील.

नित्शे ही जागतिक वाङ्मयात फार मोठी शक्ती मानली जाते. नित्शेच्या विचारानी कितीतरी नवनवीन विचारसरणींना स्फूर्ती पुरविली आहे. वाचकाना हा परिचय आवडावा.

—संपादक

अनुक्रमणिका

## अस्तित्ववाद : ( १९ )

• विश्वास पाटील

विल् हा शब्द मनोवाचक नाही. विल् मेंदूचा घटकावयव व घटक नाही. किंवा एखादा विशेष आणि स्वतंत्र असा तो अवयवही नाही. विल् ही जड वस्तू नव्हे. ती एक तात्त्विक किंवा मेटॅफिजिकल कल्पना आहे.

आपण विल् हा शब्द मानसिक अर्थाने वापरतो. तसेच विल् नावाची काही विशेष शक्ती प्राणीमात्रामध्ये, विशेषतः माणसामध्ये अस्तित्वात आहे व तिचा वापर करून माणूस अनेक गोष्टी साध्य करू शकतो असेही आपण मानतो. म्हणजेच संकल्पावर ( Volition ) आपला विश्वास असतो सामान्य माणूसच नव्हे तर अनेक तत्ववेत्तेही संकल्पावर ( Acts of will विल्च्या कृतींवर ) विश्वास ठेवतात. त्यांच्या दृष्टीने संकल्प हे कारणासारखे असून संकल्प आणि संकल्पाची सिद्धी या दोघात कार्यकारणभावात्मक संबंध आहे. उदा. माझा हात जेव्हा मी वर उचलतो तेव्हा त्या हात उचलण्याचा संबंध 'हात उचलावा' या संकल्पाशी आहे असे मी मानतो. विल् असे स्वतंत्र चालकतत्व आहे आणि ते स्वेच्छा किंवा संकल्प वापरून अनेक प्रकारच्या क्रिया घडवून आणित असते, अशी जी प्रचलित कल्पना आहे ती खोडून काढण्याचा नित्शेंचा प्रयत्न आहे. नित्शेंच्या मते अशी काही स्वायत्त, स्वतःच्या स्वतंत्र हक्काने अस्तित्वात असणारी शरीर आणि मेंदूपेक्षा वेगळी शक्ती गृहीत धरण्याचे कारण नाही. इच्छाशक्ती आणि इच्छाशक्तीच्या क्रिया असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा तो आपल्या विशिष्ट भाषिक घाटणीचा परिणाम असतो. " मानवी बुद्धीला असे वाटते की जेव्हां जेव्हा आपण एखादे कृत्य करतो तेव्हा तेव्हा ते कृत्य आपल्या विल्मुळे-आपल्या इच्छाशक्तीच्या कारणामुळे घडत असते ... म्हणजेच इच्छाशक्ती या कारणे असून जे जे काही जगात घडते ते ते या शक्तींचे परिणाम आहेत. ...विल् ही एक अशी वस्तू आहे की ती परिणाम घडवून आणते. विल् ही एक पृथक् शक्ती आहे .. आज मात्र आमच्या हे ध्यानात आले आहे की विल् हा एक केवळ शब्द आहे " ( ट्वाय्लाइट ऑफ द आयडॉल्स. भाग तिसरा–५ )

नित्शेप्रणीत विल् ही मानसिक शक्ती नव्हे ही गोष्ट बरोबर ध्यानात ठेवावयास हवी. कारण नित्शे मानसविषयक विल् किंवा संकल्पशक्तीच्या कल्पनेची





अनेकदा चेष्टा करतात. विल् ही तात्विक कल्पना आहे, तो मानसिक शक्तीवाचक शब्द नाही हे ध्यानात न घेतल्यास विल्संबंधिच्या त्यांच्या आक्रमक आणि कठोर टीकेचा अर्थ लागणार नाही. असो. विल् ही मानसशास्त्रीय कल्पना नव्हे हे एकदा ध्यानात आले की मग 'दृढ इच्छाशक्ती,' 'दुर्बल इच्छाशक्ती' किंवा 'इच्छाशक्तीचा अभाव' अशा प्रकारचे जे शब्द आपण वापरतो त्या शब्दांना नित्शेंच्या विचारात काहीच स्थान नाही हेही आपल्या ध्यानात येईल. नित्शेंच्या दृष्टीने विल् सर्वव्यापी आहे. विल् जेथे नाही असे या जगात काहीही नाही. सगळी जड आणि अजड सृष्टी हे विल्चेच रूप आहे. विल् नव्हते तेव्हा काहीही नव्हते. विल् हा विश्वाचा आदी आणि अंत होय. जे जे काही या विश्वात आहे ते ते सर्व विल्च आहे.

येथे अर्थात आपणाला नित्शेंचे विल्विषयक संपूर्ण तत्वज्ञान पाहायचे नसल्याने एकूण विवेचनाच्या सोयीसाठी आवश्यक तेवढयाच गोष्टी आपण पाहाणार आहोत. आमच्यासकट जे जे या विश्वामध्ये आपल्या दृष्टोत्पत्तीस पडते ते ते सर्व विल्चा आविष्कार असल्याने विल् अनेक वेगवेगळया पद्धतीनी प्रगटत असते असे आपण म्हणू शकतो. आपली भाषा ही विल्च्या प्रगटण्याची एक पद्धती. अशा अनेक पद्धती दाखविता येतील. विल् प्रकटते म्हणजेच विल् आकार धारण करते. वास्तवावर विशिष्ट ठसा किंवा आकार 'इम्पोज' करते. पूर्वी जेथे अस्ताव्यस्तता होती तेथे व्यवस्था, निश्चित आकार लादते. किंवा स्ट्रक्चर, संरचना नसलेल्या अवस्थेच्या ठिकाणी संरचना आणते. आपल्या शाब्दिक कल्पना ही विल्-टू-पॉवरची एक धाटणी. शाब्दिक कल्पनांच्या साहाय्याने वास्तव आपण काही एका व्यवस्थेत लावित असतो. शाब्दिक कल्पनांच्या धाटण्या हा विल्-टू-पॉवरचा एक प्रकार म्हटल्यास भाषा हा शाब्दिक धाटण्यांचा प्रकार होय. परंतु भाषा हे वास्तवाचे स्वाभाविक अंग नव्हे. भाषेमुळे वास्तवाला आकार लाभतो ही गोष्ट खरी असली तरी भाषा ही एक फसवी धाटणी आहे. कारण भाषा हा वास्तवाचा प्रकार नव्हे. किंवा अंग नव्हे. वास्तवावर भाषा बाहेरून लादण्यात येत असल्याने वास्तवाची प्रकृती विचारात घेता तो एक परकी, बाहेरचा भाग आहे. कारण ज्या वास्तवावर ती लादण्यात आलेली असते त्या वास्तवापासून ती वेगळी आहे. अर्थात अशा प्रकारे लादली गेल्याने भाषा वापरणारासाठी वास्तव सुसंगत, पद्धतशीर बनते ही गोष्ट खरीच. थोडक्यात, भाषा वास्तव इंटरप्रिट करते; वास्तवाचा ती अर्थ लावते. म्हणजे अर्थात्मक पद्धतीने वास्तव ती मांडते. भाषा हे अर्थान्वेषण आहे आणि अर्थान्वेषण असल्याने विल्-टू-पॉवरचाच तोही एक प्रकार आहे.

वास्तवाचे भाषिक वर्णन हे अर्थान्वेषण--अर्थ लावणे, अर्थात्मक मांडणे असते; ती वास्तवाची प्रतिकृती नव्हे असे आपण म्हटले. पण त्यामुळे एक गैर-

समज होण्याची शक्यता आहे. कारण अर्थान्वेषण आहे म्हणजे ते अर्थान्वेषण करणाराही कोणी वेगळा तेथे अस्तित्वात असला पाहिजे असा विचार लगेच आपल्या मनात येतो. 'अर्थ लावणे' ही एक क्रिया असल्याने ती क्रिया स्वत:हूनच घडू शकेल असे आपण मानू शकत नाही. क्रिया असल्यास ती क्रिया करणारा कोणी कर्ताही त्या क्रियेपाठिमागे अस्तित्वात असावा लागतो असे आपले व्याकरण आणि आपले तर्कशास्त्र आपणास सांगते. भाषा, व्याकरण आणि तर्कशास्त्राच्या या विवक्षित घाटण्यांचा एवढा मोठा प्रभाव आपल्या मनावर आहे की वेगळ्या प्रकारे कोठल्याही क्रियेचा विचारच आपले मन करू शकत नाही. प्रत्येक कृती-साठी ती कृती करणारा असलाच पाहिजे आणि कर्त्यावाचून क्रिया (Activity) शक्य नाही हा केवळ आपला दूषित पूर्वग्रह आहे. नित्शे म्हणतात की क्रिया हेच तेवढे वास्तव असून क्रियेच्या पाठीमागे आपण जो गृहित धरतो तो कर्ता म्हणजे भाषेची फक्त सोय आहे. कर्ता, किंवा चालक या कोठल्याही प्रकारे प्रत्यक्ष वस्तू नसून त्या केवळ भाषिक कल्पना असतात.

माणूस हा शारिराने आणि मनाने एक अतिशय दुटळा असा प्राणी असल्याने त्याला कसला ना कसला ठाम मानसिक आधार हवा असतो. म्हणून तो ठाम मानसिक विश्वास ( Certainty ) गृहित धरून त्या विश्वासाच्या आधारे जीवन व्यतीत करू पाहातो. भौतिक स्तरावर अणू किंवा अँटम आणि मानसिक स्तरावर 'मी' 'स्व' किंवा 'आत्मा' ह्या अशा प्रकारच्या नित्य वस्तू होत. बाकी सर्व गोष्टी चंचल असतील. पण 'आत्मा' आणि 'अणू' मात्र सुस्थिर असतात. असे त्याला वाटते. अणू हे सृष्टीचे सर्वात खालचे द्रव्य. ते विभागता येत नाही. म्हणजेच ते निरावयव आहे, त्याचा नाश होत नाही. तीच गोष्ट आत्म्याचीही. आत्माही फोडता येत नाही. जाळता येत नाही. शस्त्राने कापता येत नाही. आत्मा आणि अणू या दोन्ही संकल्पना, खरे तर परस्परांची प्रतिबिंबेच आहेत. भौतिक अणू हा अनाशवंत आणि अभेद्य असा जड द्रव्याचा भागांक आहे. तो स्वत: बदलत नाही. पण सृष्टीत घडून येणारे बदल त्याच्यापायी घडतात. आत्म्याचे वर्णन देखिल अणूच्या वर्णनापेक्षा फारसे भिन्न नाही. आत्मा म्हणजे अ-द्रव्यात्मक (डि-मटेरिअलाइज्ड) अणूच. जड वस्तू जशा फिक्शन्स आहेत तशाच मानसिक वस्तूदेखिल फिक्शन्स आहेत असे नित्शेंना सांगावयाचे आहे.

देकार्त स्थिर आणि नित्य असा 'मी' (आत्मा) गृहित धरतात. त्यांचे म्हणणे असे की 'मी विचार करतो किंवा मी संशय घेतो म्हणजेच विचार कर-णारा किंवा संशय घेणारा कोणीतरी मी अस्तित्वात असला पाहिजे.' यावर नित्शेंचे म्हणणे असे की, "मी विचार करतो" या प्रकारच्या ज्या वाक्यात कृती-पेक्षा कृती करणाऱ्या वेगळ्या आणि स्वतंत्र कर्त्याचे अस्तित्व सूचित करण्यात येते त्या वाक्यांचे विश्लेषण, देकार्त म्हणतात तितके साधे व सरळ नाही. विचा-

राची क्रिया घडते म्हणून ती क्रिया करणारा वेगळा कर्ता पाठीमागे अस्तित्वात असला पाहिजे असे ते मानतात. ज्याला तार्किकदृष्टया आधार नाही अशा अनेक गोष्टी देकार्त गृहित धरतात. प्रत्येक क्रियेसाठी ती क्रिया करणारा कर्ता असलाच पाहिजे ही जी व्याकरणाची सवय आपल्या अंगवळणी पडली आहे तिचा हा परिणाम आहे.

नित्शेप्रणीत विल्-टू-पॉवरचा विचार करताना महत्वाची गोष्ट ही की जड-वस्तूच्या पातळीत विल्-टू-पॉवरचा विचार होऊ शकणार नाही. कारण ती भौतिक वस्तू नव्हे. विल्-टू-पॉवर ही एनर्जी, उर्जा आहे. तिचा विचार "गत्यात्मक भागांकांत" ( Dynamic Quanta ) आपण करू शकतो. विल्-टू-पॉवर हा एक गतिमान फोर्स आहे. मात्र या फोर्सला कसल्याही प्रकारचे भौतिक अधिष्ठान नाही. हा एक फोर्स आहे ही गोष्ट आपण परिणामांवरून जाणू शकतो.

आपल्या अप्रकाशित टिपणात नित्शे एके ठिकाणी लिहितात की वस्तू आणि त्या वस्तूचे दृश्य परिणाम या दोन वेगवेगळ्या गोष्टी नव्हेत. वस्तू म्हणजे त्या वस्तूचे आपणास जाणवतात ते परिणाम होत. 'स्व-मात्र वस्तू' असे काहीही असत नाही, म्हणून परिणाम वगळून त्या परिणामाचे कारण शोधण्याचा प्रयत्न जर आपण केला तर आपल्या हाती काहीही लागणार नाही, परिणाम वगळून वस्तूसाठी वस्तूंचा विचार करता येण्यासारख्या पृथक आणि स्वतंत्र वस्तू जगात अस्तित्वात नाहीत. जगात फक्त परिणाम असतात. त्या परिणामाना चालना देणाऱ्या वस्तू कोठेही असत नाहीत. कारण वस्तू म्हणजेच परिणामांचा एकत्रित समुदाय. तेव्हा कान्टने वापरलेले 'स्व-मात्र वस्तू' ही वस्तुस्थिती नसून ते केवळ पोकळ शब्द आहेत. सारांश, जे जग आपण पाहातो ते वस्तूंचे जग नसते, ते परिणामांचे जग असते. मात्र जग परिणामांचे असले तरी हे परिणाम कशाचेही नसतात. म्हणजेच हे अमक्याचे परिणाम असे त्यांच्या बाबतीत दाखविता येत नाही. परिणाम या एंटिटीज् नव्हेत की ज्याना बाजूला काढून स्वतंत्रपणे त्यांचा अभ्यास करता येईल.

समजा, जगांत जे जे काही दिसते त्याचा विचार करताना आपण असे म्हणालो की हे सर्व विल्-टू-पॉवरचे परिणाम आहेत तर ते चालू शकेल काय ? नित्शे म्हणतील की नाही. नित्शे म्हणतील की ही कार्यकारणाची भाषा झाली. विल्-टू-पॉवर हे येथे कारण मानले जात असून दृश्य परिणाम हे कार्य मानण्यात येत आहे. परंतु विल्-टू-पॉवर हे कारण नाही, ती केवळ गत्यात्मक उर्जा आहे. तिचे केंद्र सर्वत्र आहे पण परिघ कोठेच नाही. कारण ती भौतिक वस्तू नव्हे. सगळे परिणाम विल्-टू-पॉवरमधून निघतात असे जर आपण मानले तर विल्-टू-पॉवरला कारणात्मक वस्तू मानावे लागेल. परंतु येथे कार्यकारण असा





भेदच अस्तित्वात नाही. कार्य आणि कारण यांच्यात येथे एकरूपता आहे. कार्य वगळून कारण–विल्–टू–पॉवर अस्तित्वात असू शकत नाही.

प्रत्येक क्रियापदाला कर्ता असलाच पाहिजे आणि प्रत्येक क्रियेसाठी ती क्रिया करणारा कोणीतरी स्वतंत्र सजीव असलाच पाहिजे. या भाषेच्या घाटणीमुळे नित्शेंची विल्-टू–पॉवरची कल्पना समर्पकरित्या शब्दात मांडता येणें अशक्यप्राय आहे. आपण दुसऱ्या एका प्रकारे ही कल्पना समजावून घेण्याचा प्रयत्न करू. टिपणात एके ठिकाणी नित्शे लिहितात की "प्रत्येक पृथक् शरीर ( बॉडी ) अस्तित्वात असणारे सगळे अवकाश पादाक्रांत करण्यासाठी आणि वाटेत येणाऱ्या प्रत्येक अडथळयावर मात करून जास्तीत जास्त अवकाशावर स्वतःचा अंमल प्रस्थापित करण्यासाठी ( म्ह. विल्–टू–पॉवरचा प्रभाव वाढविण्यासाठी ) झटत असते. अर्थात या प्रयत्नात ती शरीरे सतत एकमेकांवर आदळत राहातील. आणि यातून त्या त्या प्रत्येक शरिराचे प्रभावक्षेत्र निश्चित होईल. कारण एकमेकांशी जमवून घेऊनच त्या शरीराना वावरता येणार असते." येथे अर्थात शरीर हा शब्द विवाद्य आणि संशयास्पद ठरेल. कारण शरीर म्हटले की शरीरापेक्षा वेगळया आत्म्याची कल्पना तावडतोब आपण गृहित धरू. शरिराला चालक आवश्यक आहे. समजा, शरिराऐवजी आपण फोर्सची कल्पना वापरली तर ही अडचण दूर होऊ शकेल. ( प्रत्यक्षात पाहिल्यास शरिर म्हणजे बहिर्वर्तित फोर्सच असतो. ) कोठलाही फोर्स हा दुसरा फोर्स त्याची वाट अडविपर्यंत पुढे पुढे जात राहील. समजा, जर त्या फोर्सच्या वाटेत एकही अडथळा आला नाही तर हा फोर्स संपूर्ण विश्व ( अवकाश ) व्यापून टाकील. परंतु जगात अनेक 'फोर्सिस' आहेत. आणि प्रत्येकजण स्वतःचे वर्चस्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत आहे. अर्थात या सर्वांचे एकमेकावर दडपण येऊन त्यातून त्या प्रत्येकाचे विवक्षित स्थान निश्चित होईल. या प्रत्येक पृथक् बहिर्वर्तित फोर्सला आपण पॉवर–सेंटर, शक्ती केंद्र किंवा विल्–पॉइंट वा विल–बिंदू म्हणू. नव्हे नित्शे स्वतःच काही ठिकाणी हा शब्द वापरतात. थोडक्यात, हे विश्व म्हणजे अशा प्रकारच्या अगणित विल्–बिंदूंची कारवायी आहे. जिकडे पाहावे तिकडे पॉवर–स्ट्रायव्हिंग किंवा वर्चस्व–संपादनेच्छा कार्य करताना दिसते. जे जे दिसते ते ते सर्व वर्चस्व–संपादनेच्छेचा आविष्कार असल्याने नित्शेंच्या दृष्टीने ते म्हणजे विल्–टू–पॉवरचे इंटरप्रिटेशन आहे. परिवर्तन आहे. म्हणजेच परत फिक्शन आहे. कारण ते मूळ नव्हे तर मूळाचे एक परिवर्तन, रूप आहे. एकाच वेळी अशी कितीतरी रूपे आपणास दिसू शकतील.

सचेतन आणि अचेतन दोन्ही प्रकारचे दृश्य जग म्हणजे विल्–टू–पॉवरच होय. परंतु सचेतन जग थोडया वरच्या पातळीवरचे म्हणता येईल. या दोन पातळयात फरक निश्चित आहेत. परंतु ते फरक विचारात घेऊनही आपण असे म्हणू की हे सर्व विल्-टू-पॉवरचे उत्क्रमण आहे. आपल्या बौद्धिक संकल्पना म्हणजे

जसे विल्-टु-पॉवरचे परिवर्तन (इंटरप्रिटेशन) आहे. तशाच प्रकारे आपले नीति-नियमसुद्धा विल्-टू-पॉवरचेच परिवर्तन आहे. कारण आपल्या मूलभूत प्रवंधा-प्रमाणे संपूर्ण 'जीवन' हेच विल्-टू-पॉवर आहे आणि प्रसंगानुरोधाने वेगवेगळ्या प्रकारे ते बाह्य वास्तवाला समायोजित होत आहे. आपल्या बौद्धिक संकल्पना, आपल्या नीतिकल्पना, आपली जीवनमूल्ये ही सर्व समायोजने असल्याने तीही विल्-टू-पॉवरचीच अन्वेषणे असतात. त्यांचीही प्रकृती विल्-टू-पॉवरचीच आहे. कारण जे जे जीवनाला मदत करते ते ते जीवनाच्याच प्रकृतीचे म्हणावे लागते. संकल्पना, नीतिनियम, मूल्ये या सर्व जीवनाच्या मदतीसाठी तयार झालेल्या एक प्रकारच्या सोयी असल्याने विल्-टू-पॉवरची ती हत्यारेच होत. विल्बरोबरच्या विल्च्या लढ्यात विल्ला उपयोगी पडणारी हत्यारे. एका विल्ला दुसऱ्यावर वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी मदत करणारी हत्यारे.

प्रत्येक सचेतन जीव म्हणजे शक्तीकेंद्रांचा एक एकत्रित मिलाफ असल्याने एका संघटित शक्तिकेंद्राचा दुसऱ्या शक्तिकेंद्राबरोरचा संघर्ष अपरिहार्य असतो. मात्र डार्विन किंवा डार्विनवादी म्हणतात त्याप्रमाणे हा संघर्ष केवळ आत्म-सातत्यासाठी किंवा जीवरक्षणासाठी नसून तो वर्चस्व-प्रस्थापनासाठी असतो. प्रत्येक विल् शक्य तितक्या प्रमाणात दुसऱ्या विल्वर स्वतःचे वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी झटत असल्याने विल्चा आपापसातला लढा अटळ आहे. तसेच हा लढा जीवरक्षणासाठी असणेही अशक्य आहे. प्रत्येक सचेतन शरीर हे शक्तीकेंद्र आहे. ते तसे असल्याने शक्तीचा वापर तेथे अटळ आहे. शक्ती ही शक्ती असल्याने ती तिच्या स्वाभाविक प्रकृतीप्रमाणे वागणारच वागणार. ही स्वाभाविक प्रकृती म्हणजे दुसऱ्या शक्तीकेंद्राबरोबरचा संघर्ष आणि शक्य झाल्यास त्या केंद्राचा कबजा. जीवन म्हणजे वर्चस्वसंपादनाची इच्छा, सामर्थ्यप्रस्थापनाची ओढ – दोन शक्तीकेंद्रे आपापसात झगडतात आणि आत्मरक्षण हा त्या झगड्याचा एक उपपरिणाम असतो."

विल्-टू-पॉवर म्हणजे पॉवरसाठी चालू राहणारा अखंड संघर्ष असल्याने ज्याला आपण विजयानंतरचा आराम म्हणू तो आराम विल्-टू-पॉवरच्या बाबतीत अशक्यप्राय आहे. आम्ही म्हणजे आमच्या हालचाली. जीवंतपणाच्या प्रत्येक क्षणी आम्ही पॉवरसाठी झगडत असतो. पॉवरसाठी आम्ही विश्वाबरोबर झगडतो आणि त्याच पॉवरसाठी विश्व आमच्यावरोबर झगडते.

जीव किंवा विल् जीव केवळ राखून ठेवण्यासाठी धडपडत नाही. जीव अधिकाधिक पॉवर आत्मसात करण्यासाठी धडपडतो. हा नित्शेंचा विल्-टू-पॉवरच्या संबंधातला मूलभूत प्रबंध आहे. जीव अधिकाधिक पॉवरसाठी झगडत असतो याचाच अर्थ तो केवळ भौतिक समाधानासाठी ( हॅपिनेससाठी ) जगत नाही असा आहे. इतर सजीव नव्हे तर माणूसदेखिल पॉवरसाठी, शक्तिसंपा-





दनाच्या समाधानासाठी जगतो. ही शक्ती संपादन करण्यात मनुष्यप्राण्याला खूपच यश प्राप्त झाले आहे. निसर्गाला त्याने बऱ्याच प्रमाणात स्वतःच्या काबूत आणले आहे. साध्या एकपेशी सजीवाच्या अवस्थेपासून प्रारंभ करून आजची प्रगत मानवाची अवस्था त्याने प्राप्त करून घेतली आहे. म्हणजेच आज माणसापाशी भरपूर प्रमाणात शक्ती आहे. परंतु या शक्तीचा आणि त्याच्या समाधानाचा काहीही संबंध नाही. माणूस पॉवरसाठी प्रयत्न करीत होता. आणि पॉवरचा साक्षात्कार होताना त्याला आनंद होत होता. आनंद किंवा समाधान हे अशा प्रकारे आपण शक्तिमान आहोत या जाणीवेशी संबंधित आहे. पण ते त्याचे कारण मात्र नाही. झरथुष्ट्रमधला "अखेरचा माणूस" शांतीबरोबरच सौख्याची सांगड घालतो. पण ती त्याची चूक आहे कारण शांती व सौख्य यांची सांगड घालता येत नाही. संघर्षावाचून सौख्यानंद शक्य होणार नसतो. "आनंद हा जीवनाचा हेतू होऊ शकत नाही. एखादी गोष्ट आपल्या मनाप्रमाणे घडली म्हणजे आपणाला आनंद होतो."

माणसाना सुख (प्लेझर) हवे असते म्हणून तो दुःख टाळू पाहातात हे माणसाचे वर्णन नित्शेंच्या मते वस्तुस्थितीला धरून नाही. माणूसच नव्हे तर "कोठलाच सजीव" केवळ सुखासाठी धडपडत नाही. प्रत्येक सजीव स्वतःची पॉवर वाढविण्यासाठी धडपडतो. पॉवरची आसक्ती हा सजीवाचा प्राथमिक गुणधर्म ( Primitive affect–form ) असून सुख आणि दुःख हे त्या गुणधर्माचे परिणाम होत. पॉवरचा शोध म्हणजे आव्हानांचा, संकटांचा, अडथळ्यांचा जाणीवपूर्वक शोध. कारण अडचणीवर मात म्हणजेच पॉवरची आत्मप्रचिती. याचाच अर्थ माणूस दुःख टाळण्यासाठी धडपडत नसून मुद्दाम होऊन तो दुःख ओढवून घेऊ पाहातो. कारण विल्च्या वाटेत येणारा प्रत्येक अडथळा हा विल्च्या दृष्टीने दुःखच (Pain) होय. माणसासकट सगळे सजीव पॉवरसाठी प्रयत्न करतात. अडथळ्यावर मात केल्याने पॉवर जाणवते. म्हणजेच सजीव दुःख किंवा वेदनांच्या मागे जातात. एखादा अडथळा मागे टाकला गेला की आनंद होतो.

विल्–टू–पॉवरच्या अवस्थेवर आधारित दुःख दोन प्रकारचे असते. आणि आनंदही दोन प्रकारचा असतो. विल्–टू–पॉवर जेव्हा प्रबल असते तेव्हा अडथळे आणि अडचणी ( म्ह. त्यातून उत्पन्न होणारा त्रास व दुःख ) हव्याशा वाटतात. कारण अडथळे हे तेव्हा आव्हानांसारखे असतात. याच्या उलट विल् जेव्हा दुर्बल असते, थकूनभागून गेलेले असते तेव्हा दु ख नकोसे वाटते. अडचणी त्रासदायक वाटतात. तीच गोष्ट सुखाची. सुखेसुद्धा दोन प्रकारची असतात. विल् प्रबल असताना संकटाशी झगडण्यात आणि संकटावर मात करण्यात आनंद वाटतो. विल् थकलेले असताना संकटे टाळण्यात व स्वस्थपणे एके जागी बसण्यात आनंद वाटतो. विजयाचा आनंद आणि झोपेचा आनंद असे हे आनंदाचे दोन प्रकार

असतात. थकलेल्याना "विश्रांती, आराम, शांतता, क्षोप, स्वास्थ्य" हवे असते, उदा. शून्यवादी धर्म आणि तत्त्वज्ञाने. उलट जे शक्तीमान असतात "त्याना संकटे. आव्हान, संकटावर केली जाणारी मात यातला आनंद हवा असतो."

जीवनात दुःख अटळ आहे. एवढेच नव्हे तर जीवन संघर्षमय असल्याने दुःख आवश्यकसुद्धा आहे. हा जो नित्शेंचा प्रबंध आहे त्याचा विपर्यास होणे शक्य आहे. जीवन कसदार होण्यासाठी जीवनात दुःख आणि यातना आवश्यक आहेत अशी भूमिका घेतल्यावर जीवनातले दुःख कमी करण्याचे सार्वजनिक हिताचे कार्यक्रम अनाठायी मानावे लागतील. पण नित्शेंची भूमिका ती नाही. ते म्हणतात की उत्तुंग व्यक्तित्वाची जी जी माणसे दिसतात त्यांनी त्यांनी जीवनाच्या आव्हानांना कंबर कसून तोंड दिलेले असते. जेथे ऊन, वारा, पाऊस, थंडी ही सर्वच खूप असतात तेथेच उत्तुंग वृक्ष वाढतात. गच्चीतल्या संरक्षित बागेत नाही.

नित्शेंच्या दृष्टीने विल्-टू-पॉवर हे एक सर्वसमावेशक तत्व आहे. कारण जीवनाच्या प्रत्येक स्तरावर ते या ना त्या स्वरूपात आढळते. उदा. माणसाच्या आयुष्याच्या आध्यात्मिक पातळीवर विल्-टू-पॉवर कला, शास्त्र, धर्म आणि तत्वज्ञानाचे रूप घेते. अर्थात माणूस आणि माणूस जे काही करतो ते या दोघात नित्शे फरक करीत नाहीत हे येथे लक्षात ठेवावयास हवे. आम्ही म्हणजेच विल्-टू-पॉवर, आणि विल्-टू-पॉवर म्हणजे आपला फोर्स बाहेरील जगावर आपण प्रस्थापित करणे. तसेच इंटरप्रिटिंग किंवा अर्थ लावणे हा विल्च्या प्रस्थापनाचा एक प्रकार असल्याने हे सगळे अर्थ म्हणजे विल्चेच प्रकार असतात. आमची सगळी तात्विक चौकट हे अन्वेषण आहे. आणि अन्वेषण असल्याने आम्हीच आहोत. कारण अन्वेषण तयार करता करता आम्ही स्वतःला तयार केलेले असते आणि त्याच वेळी आमचे जगही व्यवस्थेमध्ये मांडलेले असते.

गुलामांच्या बाबतीत विल्-टू-पॉवर म्हणजे स्वातंत्र्याची इच्छा तर जे थोडेबहुत स्वतंत्र आणि बलवान असतात त्यांच्या बाबतीत विल्-टू-पॉवर म्हणजे इतरांवर हुकमत गाजवण्याची इच्छा असते. "परंतु माणसात जे या सर्वांपेक्षा अधिक सामर्थ्यवान, अधिक संपन्न, स्वतंत्र बाण्याचे व धैर्यशील असतात त्यांच्या बाबतीत हेच विल् मानवजातीबद्दलच्या जिव्हाळ्याच्या रूपात आढळून येते. किंवा गॉस्पेलच्या सत्याच्या, परमेश्वरावरच्या प्रेमाच्या रूपात आढळून येते." (टिपण; नित्शेंचा हा निष्कर्ष अनेकांना आश्चर्यपूर्ण वाटण्याची शक्यता आहे. परंतु नित्शेंचा संपूर्ण विचार ध्यानात घेता तसे वाटण्याचे कारण नाही. कारण 'बियॉंड गुड अँड इव्हिल'मध्ये त्यांनी विरक्त किंवा तपस्व्याच्या आदर्शाबद्दल आदर व्यक्त केला आहे. तेथे ते म्हणतात की "ज्यांचे व्यक्तित्व खंबीर आणि सामर्थ्यवान आहे अशा सर्वच व्यक्तींना इंद्रियनिग्रही, आत्मदमनी तपस्व्यांचे आकर्षण वाटत आले आहे. तपस्व्यांचे सामर्थ्य त्यांच्या स्वयंशिस्तीमधून; स्वतःवर





ते जो ताबा चालवितात त्याच्यातून आणि आत्मसंघर्षातून व्यक्त होते. तपस्व्यांचा आदर करताना असे लोक स्वतःमधीलच कशाचा तरी आदर करीत असतात. तपस्वी अनेक प्रकारच्या भौतिक सुखाना नकार देतो. स्वतःच्या आयुष्याला कठोर शिस्त लावतो. तपस्वी म्हणजे विल्–टू–पॉवरची स्वयंशिस्तच होय. सांस्कृतिकदृष्टया मानवजात जर अधिक वरच्या पायरीवर जावयाची असेल तर तिला तपस्व्याच्या एका अवस्थेतूनच वर जावे लागेल.

नित्शेचे संपूर्ण तत्त्वज्ञान पहिल्यापासून शेवटपर्यंत विल्–टू–पॉवरच्या शिकवणुकीवर आधारलेले आहे. नित्शे म्हणतात की जगाला स्वतःचा आकार, अर्थ आणि मूल्य नाही. जग निराकार, अनाम आणि अर्थहीन आहे. हा आकार, नाव आणि अर्थ आम्ही माणसे जगाला देतो. आणि आम्ही जो आकार व अर्थ जगाला देऊ त्याव्यतिरिक्त दुसरा आकार व अर्थ जगाला मिळणारसुद्धा नाही. जग स्वरूपतः निर्बुद्ध, अर्थहीन आहे. जेव्हा ही गोष्ट आपण जाणतो तेव्हा आपण शून्यवादाच्या पलीकडे जात असतो. शून्यवादी, त्याच्या आदर्श वास्तवाचा शोध बाहेरच्या जगात घेऊ पाहातो. आणि मग त्याचे अपेक्षित जग तेथे त्याला आढळले नाही, त्याने स्वतःच जगाला दिलेला आकार आणि अर्थ त्याला तेथे आढळला की वैफल्यग्रस्त होऊन जगाकडेच पाठ फिरवू पाहातो. परंतु जगाला स्वरूपतः आकार आणि अर्थ नसणे हेच जगाचे खरे स्वरूप आहे हे समजल्यावर खंत करण्याची वास्तविक काही गरजच आपणाला नाही.

" आधीपासूनच जग जसे 'आम्हाला हवे आहे' तसे आहे असे जे मानतात ते अनुत्पादक आणि अनिर्माणशील असतात. कारण जसे जग असावे असे त्याना वाटते तसे जग निर्माण करावे ही इच्छाच त्यांच्या ठिकाणी नसल्याने आधीपासून आपणाला हवे आहे तसे जग अस्तित्वात आहे असे मानून ते काल्पनिक जग मिळविण्यासाठी नाना प्रकारचे मार्ग आणि साधने शोधू पाहातात. सत्याची इच्छा ( विल्–टू–ट्रुथ ) म्हणजे निर्माणाच्या इच्छेचा ( विल्–टू–क्रिएट ) वांझपणा होय."

नित्शेचे विल् हे 'विल्–टू–क्रिएट' – निर्माणाचे विल् होते आणि त्यांच्या मते प्रत्येक तत्त्ववेत्याचे विल् हे असेच म्हणजे निर्माणाचेच विल् असावयास हवे. तात्त्विक खंडन हा तत्त्वज्ञानाचा एक भाग झाला, तुलनेने कमी महत्त्वाचा. तत्त्ववेत्यानी केवळ खंडनाशी थांबता नये. खंडन हे केवळ एक हत्यार, एक साधन असते. खंडन हे साध्य नव्हे. कोठलाही तत्त्ववेत्ता जोवर केवळ खंडनापाशी व टीकेपाशी थबकून राहातो तोवर तो तत्त्वज्ञानात्मक विल्–टू–पॉवरच्या हातातले केवळ एक हत्यार आणि साधन म्हणून वागत असतो. स्वतःच्या हक्काने अद्याप तो तत्त्ववेत्ता बनलेला नसतो.





" खरे तत्त्ववेत्ते हे नेहमी आदेशकार ( कमांडर्स ) आणि कायदा देणारे स्मृतीकार असतात. " हे असेच असावे " अशी भाषा ते करतात. मानवजातीचा ' का ? ' आणि ' कुठे ? ' कशा प्रकारचा असावा हे ते ठरवितात. हे करताना जी कच्ची मदत त्याना लागते ती मदत त्याना मानवी इतिहासाचे वेसणकार ( इतिहास संशोधन–Overpowerers of history ) आणि तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातले कष्टकरी पुरवतात. खरे तत्त्ववेत्ते निर्माणशील कल्पना शक्तीने मानवजातीच्या उद्याचा वेध घेतात. जे जे आता आहे किंवा जे जे पूर्वी होते ते ते सर्व हे त्यांची साधने, त्यांची हत्यारे, त्यांचे हातोडे असतात. त्यांचे जाणणे म्हणजेच निर्मिणे, कायदा देणे असते. आणि त्यांचे ' विल्–टू–ट्रुथ ' हे ' विल्–टू–पॉवर ' असते. ( बि. गु. अँड इ. )

अतिमानवाची कल्पना जशी अव्याहत कालचक्राच्या कल्पनेशी संबंधित आहे तशाच प्रकारे ' विल्–टू–पॉवरची ' कल्पना शून्यवादाच्या कल्पनेशी संबंधित आहे. ही दोन्ही तत्वे परस्परसंबंधित आहेत. विल्–टू–पॉवर हा निर्माणशील फोर्स खरा, परंतु निर्माणाला, कल्पनातीत निर्माणाला वाव आहे हे सिद्ध करण्यासाठी शून्यवादाच्या टीकेचीही आत्यंतिक गरज आहे. निराकार जगाला विल्–टू–पॉवर आकार आणणार असते. निर्बुद्ध, अर्थहीन जगाला अर्थ आणि मूल्य देणार असते. जगाला नाव, आकार, अर्थ आणि मूल्य सर्व काही विल्–टू–पॉवरकडून दिले जाणार आहे. कारण नाव, आकार, अर्थ आणि मूल्याशिवाय आम्ही जिवंतच राहू शकत नाही. मात्र याचा अर्थ विशिष्टच आकार, नाव, अर्थ आणि मूल्य असले पाहिजे असा नाही. हा सगळा प्रश्न सर्वस्वी मोकळा आहे. आम्ही कसे जगावे, आणि कोणता अर्थ घ्यावा हे सर्व आमच्या पसंतीवर अवलंबून आहे.

" ' अव्याहत कालचक्र ' आणि ' अतिमानव '; ' शून्यवाद ' आणि ' विल्-टू-पॉवर ' या चार परस्परावलंबी कल्पना वर आपण पाहिल्या. याच कल्पना ' परमेश्वराचा अंत झाला " या नित्शेप्रणीत जगप्रसिद्ध घोषणेच्या संबंधातही समजावून घेता येतील. या सर्व कल्पना अस्तित्त्ववादाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाच्या आहेत.

परमेश्वराच्या कल्पनेकडे नित्शे दोन अगदी वेगळ्या दृष्टीकोनातून पाहातात. परमेश्वर हे मानवी अस्तित्वाचे स्पष्टीकरण असते. तसेच मानवी आयुष्याला परमेश्वरामुळे समर्थन व प्रयोजनही मिळते. परमेश्वराच्या तत्त्वाच्या आधारे आम्ही आपल्या नैतिक व सौंदर्यवाचक कल्पना निर्माण करू शकतो. परमेश्वराचा हवाला देऊन सगळ्या त्रासदायक बौद्धिक प्रश्नातून आम्ही स्वतःची सोडवणूक करू शकतो. परमेश्वर अशा प्रकारे जग आणि जीवन बऱ्याच प्रमाणात सुरक्षित व निर्धास्त बनवितो. उलट परमेश्वराची भीती बाळगल्याने इच्छा-

शक्तीच्या कर्तबगारीवर मर्यादा पडतात. मानवी कर्तृत्वक्षेत्र आकुंचित बनते. नित्शे अशा प्रकारे परमेश्वराच्या प्रश्नाच्या अगदी मुळाशी जातात. परमेश्वराचा अंत झाल्यानंतर ज्या प्रकारचे नैतिक आणि बौद्धिक वातावरण निर्माण होण्याची शक्यता होती त्या वातावरणाचा ते खोल वेध घेतात.

परमेश्वराच्या प्रश्नाकडे नित्शे करणात्मक आणि अकरणात्मक अशा दुहेरी भूमिकेतून पाहातात. सर्व प्रकारच्या नैतिक आणि सौंदर्यवाचक मूल्याना वादातीत व शाश्वत आधार देणाऱ्या परमेश्वराच्या मृत्यूचे त्याना दुःख होते. उलट हजारो वर्षे मानवी मनावर कबजा ठेवणारे एक काल्पनिक दडपण नष्ट झाले म्हणून मानवजातीच्या सुटकेचा त्याना आनंदही होतो.

परमेश्वराचा विचार करताना नित्शे परमेश्वराच्या असण्यानसण्याच्या किंवा सत्यासत्यतेच्या प्रश्नात शिरतच नाहीत, किंवा तशा प्रकारचा बौद्धिक वादही ते घालित नाहीत. जर त्यानी तशा प्रकारचा वाद घातला असता तर कोणी त्याचा प्रतिवाद करण्याचा प्रयत्न केला असता. परंतु नित्शे तशा प्रकारच्या प्रश्नात शिरत नाहीत. ते म्हणतात की आज, काळ संपूर्णपणे बदलला आहे. लोकांच्या आध्यात्मिक विचारात – मानसिक आवडी-निवडीत – फेरफार झाले आहेत. परमेश्वराची भक्ती आणि स्वर्गप्राप्ती किंवा मुक्ती ही ध्येये आज बाद झाली आहेत. पूर्वी ही ध्येये जिवंत होती. आज ती तशी नाहीत. त्यामुळे मानवी आयुष्याच्या बाबतीत परमेश्वरविषयक चर्चा संपूर्णपणे निकालात निघाली आहे. आणि धर्म व धार्मिक श्रद्धा याही गोष्टी संपुष्टात आल्या आहेत. मानवी आयुष्याच्या साफल्यासाठी जे अनेक मार्ग असू शकतात त्यातून परमेश्वरप्राप्तीचा मार्ग आता गळला आहे.

नित्शेंच्या दृष्टीने परमेश्वर आणि धर्म या दोन्ही संस्थाच संपुष्टात आल्या आहेत. म्हणून त्यांच्याबद्दलचा वादच संभवत नाही. नित्शे असे म्हणत नाहीत की बायबलमध्ये परमेश्वरासंबंधिच्या ज्या कथा सांगितल्या आहेत त्या सर्व खोट्या आहेत. कारण त्याना ऐतिहासिक आधार नाही. किंवा धर्म या गोष्टीलाच माझा विरोध आहे. ते म्हणतात की मानवी अस्तित्वाच्या प्रश्नांवरचा परमेश्वर हा तोडगाच आता बाद झाला आहे. बदललेल्या जागतिक परिस्थितीत देव आणि दैवी कल्पनेवर आधारित धर्म या दोघानाही स्थान उरलेले नाही.

नित्शेंच्या दृष्टीने परमेश्वराचा मृत्यू हा कोठल्याही प्रकारे तार्किक निष्कर्ष नव्हता. म्हणून वादाचा प्रश्नच तिथे उद्भवत नव्हता कारण वादामुळे तेथे काहीच सिद्ध वा असिद्ध होणार नव्हते. परमेश्वराचा मृत्यू ही एक सांस्कृतिक घटना होती. काहीशी ऐतिहासिक परिस्थितीदेखिल. एकोणिसाव्या शतकातल्या जगात असे काही घडले होते – लोकांच्या बौद्धिक विचारसरणीत, त्यांच्या नैतिक

आचारविचारात, एकमेकांबरोबरच्या संबंधात, विश्वासंबंधिच्या त्यांच्या कल्पनात — की त्याच्यामुळे परमेश्वराच्या खरेपणावरचा लोकांचा विश्वास उडाला होता. या सांस्कृतिक घटनेत जे जे सामील होते ते ते सर्व परमेश्वराच्या मृत्यूला कारणीभूत होते.

नित्शे वादप्रतिवादात्मक पद्धतीने आपले विचार मांडतात. करणात्मक आणि अकरणात्मक कोठल्याही बाजूनेही जरी पाहिले तरी परमेश्वराच्या मृत्यूची बाब अत्यंत गंभीर आहे असे त्यांचे मत आहे. इतकी गंभीर की अनेक लोक स्वतःशी देखिल तिची वाच्यता करू धजत नाहीत. अकरणात्मक दृष्टीतून पाहिल्यास परमेश्वराचा मृत्यू म्हणजे आजवरच्या सगळ्या परिचिताचा विलय आणि एका अनामिक भीतीला आमंत्रण. करणात्मक दृष्टीतून पहिल्यास एका नव्या जगाची आणि जीवनाचीही नांदी. परमेश्वराच्या मृत्यूमुळे एकीकडे जुने सर्व भग्न पावले आहे. जुन्या विश्वासाला तडा गेला आहे. तर दुसरीकडे नव्या सूर्याचा पहिला प्रकाश क्षितिजावर पसरू लागला आहे.

"एक सूर्य क्षितिजाआड बुडाला. पण कोणी सांगावे उलटया बाजूला नवा सूर्य एव्हाना आकाशात वर चढूदेखिल लागला असेल."

"परमेश्वराच्या मृत्यूच्या घटनेला दोन बाजू आहेत. एक नकारात्मक: फारच थोड्यांना परमेश्वराच्या मृत्यूचे दारुण परिणाम जाणवू लागले असतील ! फारच थोड्यांना logic of terror समजले असेल ! आणि यापैकी काहीजण तरी समजूनही न उमजल्यासारखे वागत राहातील. परंतु त्यांच्यात असेही काही थोडेजण असतील की परमेश्वराच्या मृत्यूचे सगळे महाभयानक परिणाम ते जाणवून घेतीलच. पण जे या "ग्लानी आणणाऱ्या काळोख्या काळाच्या" पलिकडे पाहाण्याचा प्रयत्न करतील. परमेश्वराच्या मृत्यूचा खरा अर्थ ज्यांच्या ध्यानात आला त्यांना आणि कदाचित फक्त त्यानाच निराश होण्याचे कारण पडणार नाही कारण जी घटना एका प्रकारचे जग संपुष्टात आणते तीच दुसऱ्या प्रकारच्या जगाला चालनाही देत असते."

परमेश्वराच्या मृत्यूमुळे माणसापुढे जरी अनेक गंभीर समस्या उभ्या राहतात— कारण प्रस्थापित नैतिक मूल्ये आणि जीवनाचा संभाव्य अंतिम अर्थ कोणताही परमेश्वराच्या अंताबरोबर निराधार बनतात. आणि या समस्या सोडविणे मानवी समजाबाहेरचे काम असले तरी परमेश्वराच्या मृत्यूबरोबर मानवी मन संपूर्णपणे स्वतंत्र बनते हाही मोठा फायदा परमेश्वराच्या मृत्यूने घडला असे नित्शे म्हणतात. जेव्हा नेहमीच्या सरावाचे व परिचयाचे निर्धास्त, सुरक्षित जग अकस्मात संपुष्टात येते तेव्हा तो अनुभव कोणालाही धक्कादायक ठरणार असतो. [illegible] ना आज ठरला आहे. जे या धक्क्याला तोंड देण्याइतके सिद्ध असतात त्यांच्यासाठी आत्म व जीवनसाफल्याच्या अनेक नव्या संधी

आता उपलब्ध होणे शक्य असते. परमेश्वराच्या अंतासंबंधी नित्शेची भूमिका कमालिची वास्तववादी आहे. ते म्हणतात की परमेश्वराचा अंत घडून आला आणि आपल्या मनावर ताबा गाजविणारी एक शक्ती संपुष्टात आली म्हणून आपले जीवन कोठल्याही प्रकारे पूर्वीपेक्षा अधिक सुलभ बनणार नाही. तसेच कोठल्याही बाबतीत ते पूर्वीपेक्षा अधिक सुरक्षित, अधिक सुखी वा आनंदीसुद्धा बनणार नाही. कदाचित पूर्वीपेक्षा ते अधिक बिकट व असुरक्षित बनण्याची शक्यताच अधिक आहे. या नव्या जीवनक्रमाच्या मार्गावर अनेक छुपे धोके व संकटे दबा धरून आहेत. परंतु—आणि नित्शे म्हणतात की हा परंतुच फार महत्वाचा आहे कारण नव्या युगाचा प्रारंभ या परंतुने होणार आहे— हे नवे जीवन स्वाधीन व स्वायत्त असेल. जीवनाच्या बाबतीत आजवर माणूस परमेश्वराच्या कल्पनेवर विसंबून असे. यापुढे तो तसा विसंबून नसेल. " समुद्र, आमचा समुद्र पुन्हा एकदा आमच्यासाठी स्वतंत्र बनला आहे. आणि दूरवर पसरलेली आमची वाट आमच्या डोळ्यांना दिसत आहे. " मानवजातीच्या आजवरच्या संपूर्ण इतिहासात अगदी पहिल्यानेच स्वतःव्यतिरिक्त इतर कोठल्याही काल्पनिक शक्तींचा आधार न घेता जगण्याचा प्रयत्न माणूस करणार आहे. माणसाच्या आयुष्यात हा सगळ्यात महान दिवस होय. कारण या दिवशी माणूस सर्वार्थाने स्वतंत्र बनतो आहे. जोवर माणूस स्वतःच्या एकट्याच्या धीराने जगत नाही, अनेक प्रकारच्या काल्पनिक श्रद्धा आणि विश्वासांच्या आधारे जगत असतो तोवर खऱ्या अर्थाने तो माणूस—निर्माणशील माणूसही बनत नाही.

नित्शेंच्या दृष्टीने परमेश्वर हे एक कल्पित आहे. माणसाच्या डोक्यात स्वतःच्या काल्पनिक सामर्थ्याविषयी ज्या अपेक्षा असतात त्या तो एका काल्पनिक प्रतीकावर प्रक्षेपित करतो. कालांतराने स्वतःपेक्षा हे प्रतीकच त्याला अधिक खरे वाटू लागते. जोवर हे कल्पित भंग पावत नाही तोवर माणसाला त्याच्या खऱ्या स्थितीची खरी कल्पना येत नाही आणि त्याची कल्पनाशक्तीही त्याला परत मिळत नाही. जोवर माणसाला त्याची कल्पनाशक्ती परत मिळत नाही तोवर माणूस बाल्यावस्थेतून बाहेर पडून प्रौढत्वाकडेही जात नाही.

परमेश्वराच्या मृत्यूबरोबर परमेश्वररूपी काल्पनिक जोखडातून मानवी मन मुक्त होते एवढाच काही परमेश्वराच्या मृत्यूच्या घटनेचा अर्थ नाही. याच प्रश्नाला त्यापेक्षाही अधिक गंभीर अशी दुसरी एक बाजू आहे. परमेश्वराच्या मृत्यूबरोबर माणूस एका बंधनातून सुटला ही गोष्ट खरी परंतु या एका बंधनाबरोबर संपूर्ण बंधनच नष्ट झाले असे घडत नाही. माणूस बंधनातून तर सुटत नाहीच. परंतु पूर्वीपेक्षाही अधिक कठोर व कठीण बंधनात तो आता अडकतो. पूर्वी अंतिम अर्थाने परमेश्वरच सर्व गोष्टींना जबाबदार होता. आता जे जे काही या जगात घडेल त्याला फक्त माणूसच जबाबदार असणार आहे. स्वतःच्या

प्रारब्धासाठी, स्वतःच्या कृत्यासाठी, यापुढे इतर कुणालाच–कोठल्याही चिरंतन परमेश्वराला तो जबाबदार धरू शकणार आहे.

परमेश्वराचा अंत ही इतकी साधी घटना नाही की जिचे परिणाम सहजासहजी वाऱ्यावर विरून जावेत. परमेश्वराचा मृत्यू म्हणजे एका देदिप्यमान्य सूर्याचा लोप. कभिन्न काळोखाच्या साम्राज्याचे आक्रमण. नित्शे म्हणतात की परमेश्वराच्या मृत्यूबरोबरच मानवी मन इतके संभ्रमित बनणार आहे की आपण काय आहोत, कशासाठी जगत आहोत, कोठे चाललो आहोत, आपले पुढे काय होणार आहे यापैकी एकाही प्रश्नाचे उत्तर त्या मनाला देता येणे शक्य होणार नाही. वर आणि खाली, या बाजूला आणि त्या बाजूला, या शब्दाना यापुढे अर्थच उरणार नाही. मात्र हे सर्व त्या मनाला आताच जाणवेल असेही नाही. कदाचित तावडतोब यापैकी काहीच जाणवणार नाही. त्याचे जग पूर्वीप्रमाणेच सुरू राहील. अपेक्षेबरहुकूम. निर्धास्त. परंतु जसजसा काळ उलटत जाईल तसतसा त्या मनाचा संभ्रम वाढत जाईल. ते मन नैतिकदृष्ट्या कोलमडून जाईल. त्या मनाची धास्तीग्रस्तता असह्य होईल. परमेश्वराच्या मृत्यूमुळे, माणूस बनता येण्यासाठी माणसाची मुक्तता झाली असली, तरी माणसाच्या मनावर सत्ता चालविणारा परमेश्वर नष्ट झाला एवढ्याने माणूस तावडतोब **माणूस** बनणार आहे असे नाही. कोणी सांगावे माणूस कदाचित पशुत्वाप्रतही जाईल. माणूस हा पशू आणि अतिमानव या दोन टोकात ताणला गेला आहे आणि अतिमानवता त्याच्या बाबतीत अपरिहार्य नाही.

परमेश्वराच्या मृत्यूने माणसाची एका बंधनातून सुटका झाली असली तरी नव्या अधिक कडक बंधनात तो स्वतः होऊन अडकला आहे. स्वेच्छित, स्वेच्छापूर्वक पत्करलेले बंधन. नवे कर्तव्य, नवी जबाबदारी आणणारे बंधन. या जबाबदारीला तोंड देण्यासाठी स्वतःव्यतिरिक्त आणखी कोणावरही तो अवलंबून राहू शकत नाही. त्याने स्वतःलाच आता असे घडविले पाहिजे की त्याचा हू नवा 'मी' प्राप्त जबाबदारीला पुरा पडू शकेल. सारांश, परमेश्वराचे उच्चाटन केले गेल्याने त्याने स्वतःच आता परमेश्वराचे स्थान घेतले पाहिजे. जे जे गुणधर्म मागे त्याने परमेश्वराच्या ठिकाणी शोधले तेच गुणधर्म त्याला आता स्वतःच्या ठिकाणी साध्य करावयास हवेत.

परमेश्वराच्या मृत्यूनंतर माणूस स्वतःच जर प्रतिपरमेश्वर बनू शकला नाही तर परमेश्वराचे आत्मबलिदान केवळ व्यर्थ ठरणार आहे. आजवर माणूस स्वतःकडे केवळ एक निर्मिती – परमेश्वराची निर्मिती म्हणून पाहात होता. आता त्याला निर्माणकार आणि निर्मिती दोन्ही भूमिका स्वतःलाच करायच्या आहेत. माणसाच्या बाबतीत येथून पुढे माणूस हाच अंतिम शब्द होय. सर्व गोष्टींचा अंतिम निकष आणि प्रमाण. न्यायाधिशही तोच असेल आणि ज्याचा न्याय



अनुक्रमणिका



करायचा तोही तोच असेल. स्वत:च स्वत:चे जग आता माणसाला निर्मावे लागेल. त्याची दिशा ठरवावी लागेल. न्यायान्याय, इष्टानिष्ट, नीतीअनिती सगळ्यांचा निवाडा स्वत:च्या जबाबदारीवर करावा लागेल. हे नवे जग फक्त माणसाचे — माणसाने माणसासाठी तयार केलेले — असेल. स्वत:च्या प्रयत्नाने घडविलेले आणि आपणच ते घडविले आहे याची संपूर्ण जाणीव असलेले त्याच्या हक्काचे जग. आजवर हे श्रेय तो परमेश्वराला देत होता. स्वत:कडे परमेश्वराची एक करणी म्हणून पाहात होता. येथून पुढे तो स्वत: निर्माता असेल आणि निर्मितीही असेल. साहजिकच या निर्मितीकडे तो अधिक प्रेमाने, अधिक आपलेपणाने पाहिल.

परमेश्वराबद्दल नित्शेचा झरथुष्ट्र म्हणतो की " मला फक्त एकाच देवाचा भरंवसा देता येईल. जो आनंदाने नाचू शकतो अशाच देवाचा भरंवसा मी देऊ शकतो." परमेश्वराचा अंत झाल्याने आपोआप माणसाचा प्रतिपरमेश्वरच नव्हे तर खराखुरा माणूस होईल असे मुळीच नाही. माणूस जर खऱ्या अर्थाने माणूस व्हायचा असेल तर त्याला त्याची सद्य अवस्था ओलांडून पलिकडे जावयास हवे. स्वत:पेक्षा काही भव्य अशा नव्या प्रतिमेवर प्रेम करावे लागेल.

परमेश्वराच्या अंताबरोबरच निर्माण होणारे हे नवे आव्हान माणसातल्या सर्जनशक्तीला आहे. झरथुष्ट्र म्हणतो की, " मी तुम्हाला अतिमानवाची धडा शिकवत आहे. माणूस हे असे काहीतरी आहे की जे मागे टाकले गेलेच पाहिजे. सांगा बरे, माणूस मागे टाकून 'माणसाच्या पलिकडे जाण्यासाठी तुम्ही स्वत: काय केले आहे ? "

परमेश्वराचा अंत ही एक मानसिक अवस्था आहे. परंतु " परमेश्वराचा अंत झाला " ही घोषणा केवळ त्या मानसिक अवस्थेला शब्द पुरविण्यासाठी केली गेली नव्हती. ही घोषणा करून नित्शेना आणखी असे सूचित करायचे होते की एकदा मृत झालेला परमेश्वर आता परत जिवंत होणार नाही. परमेश्वराचे पुनरागमन अशक्य आहे. तेव्हा परमेश्वर नसलेल्या व पुढेही कधी नसणाऱ्या या नव्या जगात आम्ही जगावे कसे हे ज्याचे त्याने ठरवायचे आहे. पण हे जगणे असे असावे की ते जगणेच जगण्याचे समर्थन व्हावे !

परमेश्वराचा अंत झाला आहे. माणसाची दयनीय आणि घृणास्पद अवस्था पाहून दु:ख व करुणेने परमेश्वराचे मन इतके भरून गेले की त्यातच त्याचा अंत झाला. परमेश्वराबरोबरच मानवी आयुष्याला सार्थकता, समर्थन व स्पष्टीकरण देणारे एक चिरंतन कारणही माणसाने संपुष्टात आणले आहे. आता पुढे काय ?

' अतिमानव ' हा या प्रश्नाचा नित्शेप्रणीत संभाव्य उलगडा आहे. " झरथुष्ट्र म्हणे " नावाचे नित्शेचे एक पुस्तक आहे. त्यात Ugliest man

या प्रकरणात परमेश्वराचा मृत्यू आणि त्यातून निर्माण होणारी मानसिक-भावनिक परिस्थिती यावरचे नित्शेंचे भाष्य आले आहे.

झरथुष्ट्र देशोदेशी फिरत असता एकदा मृत्यूच्या दरीत येतो. तेथे त्याला हा 'घृणास्पद मनुष्य' भेटतो. त्याला पाहाताच झरथुष्ट्र त्याच्या पिकलेल्या लांब दाढीच्या थेट मुळापर्यंत लाजेने लाल बनतो. कुणाचे व्यंग पाहून उगाचच आपण त्याला लाजविले या विचाराने झरथुष्ट्र बाजूला सरकत असता 'घृणास्पद माणूस' त्याला म्हणतो की "हे झरथुष्ट्रा, ओळख पाहू माझे गुपित. मी कोण ? आणि साक्षीदाराबर मी सूड घेतला या माझ्या शब्दांचा खरा अर्थ काय ?" झरथुष्ट्र म्हणतो की, "अरे ओंगळ मनुष्या, तूच तो परमेश्वराचा मारेकरी. आता मला येथून जाऊं दे. ज्याने तुझी लज्जित अवस्था पाहिली, ज्याने तुला आरपार ओळखले त्याला तू जिवंत सोडणेच कठीण. कारण तुझ्या हिशेबी त्याला क्षमा असणे शक्य नाही. ज्याने तुझी लाज पाहिली त्याचा तू प्राण घेतलास."

ओंगळ मनुष्य म्हणतो की, "हे झरथुष्ट्रा, खरे आहेत तुझे शब्द. त्याने माझी लाज पाहिली होती. म्हणून त्याला मी जिवंत ठेवणेच शक्य नव्हते. त्याला मरावेच लागणार होते. कारण त्याने माझे गुह्य पाहिले होते. आणि माझे गुह्य पाहून शरमेने त्याचे मन अगदी काठोकाठ भरून गले. त्याने माझी लाज पाहिली असल्याने तो किंवा मी यापैकी फक्त कोणीतरी एकच जिवंत राहू शकला असता !"

नित्शेंच्या वरच्या रूपकातला ओंगळ मनुष्य म्हणजे मानवजात आणि साक्षीदार तो परमेश्वर होय. ओंगळ मनुष्य, त्या ओंगळ मनुष्याच्या ओंगळपणाचा साक्षीदार आणि साक्षीदाराचा ओंगळ मनुष्याने केलेला वध असे तिहेरी रूपक मांडून नित्शे यांनी अतिमानवाचे प्रमेय आपल्यासमोर ठेवले आहे. परमेश्वर सर्वसाक्षी आहे. आणि माणूस असावा तेवढा पवित्र, निर्दोष नाही. अशा परिस्थितीत स्वतःचे गुह्य पाहाणाऱ्या आणि आपल्या बऱ्यावाईटाचा न्याय करू इच्छिणाऱ्याला कोण बरे जिवंत ठेवील ? परंतु साक्षीदार मेल्याने मूळ वस्तुस्थितीत काही बदल होऊ शकतो काय ? नित्शेंच्या मते, 'नाही.' कारण लाज आपली आपल्याला वाटते. लाजेचा प्रश्न सोडविण्यासाठी लाज वाटण्याचे कारणच नष्ट करावयास हवे. मी स्वतःच इतका चांगला बनलो पाहिजे की कोणाहीसमोर लाजण्याचे मला कारणच पडू नये. लाजेच्या प्रश्नावरचे नित्शेंचे उत्तर अतिमानव हे आहे. मानव मागे टाकून त्या मानवातूनच जर अतिमानव उत्पन्न झाला तर लाजण्याचे कारण उरणार नाही. पण त्याच वेळी परमेश्वराचीही गरज राहाणार नाही. कारण आता माणूस स्वतःच परमेश्वरसदृश बनला असेल.

परमेश्वरासंबंधिची नित्शेंची भूमिका वादप्रतिवादात्मक आहे. परमेश्वराचा वध ते एकतर्फी इष्ट मानीत नाहीत. परमेश्वराच्या अंतानंतर परमेश्वराचा अंत घडवून आणणारा माणूस स्वतःच जर नवा परमेश्वर झाला नाही तर परमेश्वराचा अंत निव्वळ वायफळच ठरणार नसून एकूण मानवी भवितव्याच्या दृष्टीने विचार करता घोडचूक ठरणार आहे असे नित्शे मानतात. परमेश्वराच्या अंतावरोबर इच्छाशक्तीसकट मनुष्याच्या सगळ्या शक्ती मुक्त बनतात. या शक्तींना जर त्यांच्या जोगता कार्यक्रम पुरविला गेला नाही तर त्या शक्ती भ्रष्ट होतील. त्याना अनिष्ट वळण लागेल. त्या स्वतःवरच उलटतील. आत्मविध्वंसनाला प्रवृत्त होतील. आपली लाज पाहिली म्हणून कोणाचा जर वध करायचा असेल तर तो लाजेचा वध केला गेला पाहिजे. लाजण्याचे कारणच उरू देता नये. स्वतःच्या ओंगळ आत्मप्रतिमेचे निराकरण करून त्या जागी अधिक उदात्त प्रतिमेची प्रतिष्ठापना ही माणसाच्या माणूसपणाची नित्शेप्रणीत अंतिम कसोटी आहे.

निरनिराळ्या भौतिक शास्त्रांची प्रगती आणि औद्योगिकीकरणातली वाढ यातून जो नवी सामाजिक-मानसिक समस्यापूर्ण परिस्थिती निर्माण होते तिच्यावरचा नित्शेप्रणीत तोडगा म्हणजे अतिमानवाची कल्पना.

नित्शे ज्या जगाबद्दल बोलतात ते ज्या जगातून देव नष्ट झाला आहे असे जग आहे. नास्तिकाचे जग आस्तिकाच्या जगापेक्षा आमूलाग्र वेगळे असते. निदान ते वेगळे असावे. मात्र एका जगात परमेश्वर असतो व दुसऱ्यात तो नसतो एवढाच या दोन जगातला फरक नाही. आपण चुकीने तसे मानतो. परमेश्वर वगळता आस्तिक व नास्तिक समान गोष्टी मानतात आणि समान गोष्टींना विरोध करतात असे आपण समजतो. आस्तिक परमेश्वराच्या आधाराने जगतो. वागतो. नास्तिकासाठी अशा प्रकारचा कोठलाच आधार असत नाही. नास्तिकाला स्वतःचे सगळे निर्णय स्वतःच्या नैतिक जबाबदारीवर घ्यावे लागतात आणि ते घेताना स्वतः बाहेरच्या कोठल्याही लौकिक वा अलौकिक तत्त्वाचा आधार त्याला घेता येणार नसतो. तो स्वतः हीच त्याच्या बाबतीत अंतिम सत्ता. आस्तिक अशा वेळी परमेश्वराचा हवाला देऊ शकतो. सारांश, एखादा माणूस जेव्हा परमेश्वराच्या कल्पनेला नकार देतो तेव्हा त्याच वेळी तो त्या कल्पनेच्या आधारेच फक्त चालू शकणाऱ्या नैतिक व सौंदर्यवाचक प्रमाणानाही नकार देत असतो.

परमेश्वराची कल्पना जेव्हा संपुष्टात येते तेव्हा त्या कल्पनेला धरून असलेले नैतिक व सौंदर्यवाचक जगदेखिल संपुष्टात येते. नुसतेच संपुष्टात येते असे नव्हे तर विध्वंसकरित्या संपुष्टात येते. आणि हाच खरा मानवी आयुष्याच्या बाबतीतला फार मोठा प्रश्न होय. कारण ज्या जगात परमेश्वर नाही, म्हणजे आयुष्याला मूळ दिशा देणारे अबाधित तत्व नाही, त्या जगात राहाणे म्हणजे असे





तत्व निर्माण करण्याची जबाबदारी घेणे होय. परमेश्वर हे तत्व नाही म्हटले तरी सामुदायिक स्वरूपाचे असते. येथे नवे तत्व प्रत्येकाच्या वैयक्तिक जबाबदारीवर निर्माण होणार आहे. सारांश, सगळे जगणेच पुन्हा नव्याने आखावे लागते.

नित्शे स्वतःला A–moralist न–नीतीवादी म्हणवून घेतात. कारण सगळ्या नैतिक विचारसरणींच्या पलिकडची किंवा आधीची म्हणा, वैचारिक भूमिका ते घेतात. याचाच अर्थ असा की एका वेगळ्या दृष्टीने त्यांची बैठक नीतीवादाचीच आहे. ती नीतीविरोधी नाही. झालेच तर पूर्वीच्या नैतिक बैठकींपेक्षा ती काकणभर अधिक कठोरच आहे. पूर्वीच्या नैतिक बैठकीत पारंपरिक संकेत केवळ संकेत म्हणून पाळले जातात. या सर्व अंगवळणी पडलेल्या संवयी असतात. व संवयी म्हणून मनुष्ये त्या पाळतात. नित्शे त्याऐवजी वैयक्तिक जबाबदारीचा नीतीधर्म शिकवू इच्छितात. नित्शे म्हणतात की मनुष्ये नैतिक संवयी पाळतात कारण त्यांच्या दृष्टीने त्या परमेश्वर–प्रणीत असतात. किंवा त्याना समाजाची मान्यता असते. किंवा हुकूमशहाने त्या लादलेल्या आहेत. थोडक्यात या प्रकारच्या नैतिक सवयींचा आधार स्वतःच्या बाहेर कोठेतरी असतो. नित्शेंच्या दृष्टीने हा आधार बाहेरचा असल्याने कोठल्याही क्षणी त्याचे प्रामाण्य निकामी बनू शकते. मग काय ? आता मनुष्यानी कशाच्या आधारे जगावे ? तेव्हा मनुष्याने स्वतःच स्वतःचे नैतिक यम–नियम निश्चित करावे व त्यांच्या आधारे स्वतःचे आयुष्य जगावे. येथे स्वतःच्या बऱ्यावाईट सगळ्या कृत्यांची जबाबदारी स्वतःच्या शिरावर घ्यायची असल्याने हे जगणे इतर प्रकारच्या जगण्यापेक्षा अधिक कष्टप्रद असेल कारण या प्रकारच्या जगण्यात स्वतःव्यतिरिक्त इतर कुणाला वा कशालाही– परमेश्वर, धर्मग्रंथ, हुकूमशहा, समाजधर्म, राष्ट्रधर्म–जबाबदार धरता येत नाही. येथे व्यक्ती स्वतःच स्वतःला जबाबदार असेल.

नित्शे नैतिक स्वैराचाराचा पुरस्कार करीत नाहीत. किंवा नैतिक अराजकाला त्यांचा पाठिंबा नाही. नित्शे स्वतःला विमुक्त म्हणजे बंधनातून बाहेर पडलेले समजतात आणि पहिल्यापेक्षा अधिक जबाबदारही समजतात.–स्वतःच स्वतःला जबाबदार. जगातल्या पूर्वीच्या, आताच्या व नंतरच्या सर्वांच्या सर्व घटनाना जबाबदार. मी हाच आणि असाच आहे याचे कारण माझ्या मागचे सर्व प्रसंगसुद्धा तेच आणि तसेच होते. त्यांच्यात जर बदल घडला असता तर मी सुद्धा हाच आणि असाच असलो नसतो. हा आताचा क्षण जर माझ्या दृष्टीने स्तुत्य आहे तर त्याच्या मागील सर्व क्षण, अगदी विश्वाच्या आरंभापासूनचे सर्व क्षण व प्रसंगही मी स्तुत्य मानले पाहिजेत. कारण हा आताचा क्षण मागच्या व पुढच्या सर्व क्षणांशी व प्रसंगांशी अतिशय नकाशास्त्राने बद्ध आहे. या क्षणाचा गौरव म्हणजे मागील व पुढील सर्व क्षणांचा गौरव होय. नित्शेंची नैतिक भूमिका विरोधाभासात्मक आहे–मुक्त म्हणजे परमेश्वराच्या काल्पनिक दडपणापासून मुक्त आणि





जबाबदार म्हणजे स्वतःच्या स्वतःला जबाबदार. परमेश्वराच्या कल्पनेसारख्या कोठल्याही अलौकिक प्रमाणाचा आधार न घेता केवळ लौकिक प्रमाणाच्या आधारे नैतिक शास्त्र मांडण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. नित्शे शून्यवादी नाहीत आणि न-नीतीवादी वा अ-नीतीवादीही नाहीत.

परमेश्वराच्या प्रमाणाऐवजी नित्शे सामर्थ्याचे लौकिक प्रमाण गृहित धरून स्वतःची मूल्यकल्पना सूचित करू पाहातात. त्यांच्या मते मनुष्ये जन्मतःच सामर्थ्यवान असतात किंवा दुर्बल असतात. म्हणजे जगात फक्त दोन प्रकारची मनुष्ये आहेत : सामर्थ्यवान आणि दुर्बल. जी सामर्थ्यवान आहेत त्याना अट्टाहासाने स्वतःच्या सामर्थ्याचे प्रदर्शन करण्याची गरज नसते. उलट जी दुर्बल आहेत त्याना सामर्थ्याचे सोंग आणण्याची गरज असते. कारण ती मनातून सामर्थ्यवानांचा हेवा आणि द्वेष करतात. खरे सामर्थ्य त्यांच्या अंगी नसल्याने व सामर्थ्याचे त्यानी सोंग आणलेले असल्याने त्यांचा ओढा साहजिकच जुलूम करण्याकडे असतो. हा जुलूम ती प्रत्यक्ष शारिरीक अत्याचाराच्या स्वरूपात कर-तील. किंवा खोटा चांगुलपणा, खोटी नम्रता वगैरे सद्‌गुणांचे खोटे प्रदर्शन करून सामर्थ्यवानाना लाजवून करतील ( "तुझ्या एका गालात मारले तर तू तुझा दुसरा गाल पुढे कर" वगैरे. ) अर्थात कधीतरी सामर्थ्याची झळ लागून कोणा असमर्थाला त्रास होण्याची शक्यता नाकारता येत नाही. पण सामर्थ्यवान हेतु-पुरस्सर तसे करणार नाही. कारण स्वतःच्या सामर्थ्याविद्दल तो कॉन्शस असतो. स्वतःच्या सामर्थ्याची त्याला योग्य ती जाणीव असते व म्हणून तो खबरदारीने वागू पाहतो. येथे जगभरच्या सगळ्या साधुसंतांच्या लैंगिक प्रवृत्तीबद्दलच्या सावधगिरीच्या सूचनेचे उदाहरण घेता येईल. सगळे साधुसंत स्त्रीला पापाची खाण मानतात व वैषयिक सुखाचा त्याग शिकवितात. सामान्य मनुष्य काम वासनेबद्दल असे बोलत नाही. मग साधुसंतानीच कामवासनेचा इतका तीव्र निषेध का करावा? याचे महत्त्वाचे कारण हे आहे की या लोकांची कामवासना सामान्य लोकांच्या कामवासनेपेक्षा अधिक तीव्र असल्याने आयुष्यात फार आधीपासूनच त्या वासनेच्या आवेगाची जाणीव त्याना आलेली असते व तिच्यावर कुरघोडी करण्याची गरजही त्याना भासलेली असते. सांगायची गोष्ट ही की सार्थ्याची जाणीव असलेला माणूस सामर्थ्याची आठवण ठेवून वागणार असतो. पण सामर्थ्याचे सोंग आणणाराला तसे जबाबदारीने वागणे जमत नाही. कारण त्याच्या अंगी खरे सामर्थ्य नसल्याने सामर्थ्यावर ताबा ठेवण्याची गरज त्याला भासत नाही. परिणामी त्याचे वागणे क्रूर ठरू शकते. नैतिक शास्त्राबद्दलचा हा भाग पुढे येणारच आहे.

ख्रिस्ती धर्म आणि इतर सर्वच धर्मपंथांकडे पाहाण्याचा नित्शेंचा दृष्टीकोन मोठा अभ्यासण्याजोगा आहे. नित्शेंच्या दृष्टीने जीवनाचा स्थायीभाव संघर्ष आहे.

धर्मपंथ हा संघर्ष नष्ट करू पाहातात. कारण धर्म रिप्रेशन किंवा प्रेरणांचा निरोध यावर आधारित असतात. संघर्षासाठी, संघर्ष करणारी दोन परस्पराविरुद्ध पदे आवश्यक असतात. ही पदे जर नसतील तर संघर्ष होऊ शकणार नाही. सर्वच धर्म आत्मनिरोधाची कास धरतात व स्वत:ला नको असणाऱ्या प्रवृत्तींचे पूर्ण उच्चाटण करू पाहातात. म्हणजे संघर्ष करणाऱ्या दोन पदांपैकी एका पदाला नामशेष करू पाहातात. नित्शे संघर्षातून–आत्मसंघर्षातून आत्मोन्नयनाकडे व आत्मपूर्णत्वाकडे जाऊ पाहातात. धर्म संघर्षाला नकार देतात. कारण धर्माची श्रद्धा लौकिकापेक्षा पारलौकिकावर व ऐहिकापेक्षा अतिभौतिकावर अधिक असते.

ख्रिस्ती धर्मावरची नित्शेंची टीका म्हणूनच धर्मविषयक इतर प्रकारच्या टीकांपेक्षा सर्वस्वी वेगळी आहे. नित्शे म्हणतात की ख्रिस्ती धर्मांत श्रद्धेला– परमेश्वरावरच्या, येशूवरच्या, अंतिम परमेश्वरी न्यायदानावरच्या, मुक्तीवरच्या श्रद्धेला अत्यंत महत्व आहे. या गोष्टींच्या तुलनेत पृथ्वी किंवा ऐहिकाला तेथे अत्यंत कमी मानण्यात येते. नव्हे, सतत स्वत:वर विजय मिळवित स्वत:पेक्षाही मध्य अशा आदर्शाकडे जात राहाण्याच्या विल्–टू–पॉवरच्या प्रयत्नालाच तेथे विरोध करण्यात येतो. पूर्णत्व नव्हे तर आत्मखच्चीकरण हा तेथील आदर्श आहे. संघर्ष नको तर वासनांचे खच्चीकरण हवे, वासनांचा अवरोध हवा ही तेथील भूमिका आहे. नित्शे म्हणतात की ख्रिस्ताने जगाला आत्मसंघर्षाची शिकवणूक दिली. ख्रिस्त म्हणाला की तुम्ही माझ्यासारखे व्हा. येशूच्या संघर्षाच्या धड्याचे रूपांतर सेंट पॉलने येशूवरच्या श्रद्धेच्या धड्यात केले. स्वत:शी झगडत, झगडत वरवर जा, आत्मविकास करून घ्या याऐवजी येशूला शरण जा, येशूवर विश्वास ठेवा या प्रकारचा पर्याय त्याने लोकाना शिकविला. म्हणजे संघर्षाच्या प्रमेयालाच सेंट पॉलने मानवी जीवनातून हद्दपार केले. नित्शे म्हणतात की श्रद्धेमुळे मानवी इच्छाशक्ती कमकुवत बनते. धार्मिक श्रद्धा म्हणजे इच्छाशक्तीची शबलता आणि बौद्धिक श्रद्धा ( प्रगतीची अपरिहार्यता, इतिहासाची सांगता इत्यादी ) म्हणजे विचारशक्तीची शबलता. श्रद्धा म्हणजे संघर्ष डावलण्यासाठी माणसाने रचलेला एक डाव एक वंचक कल्पना.

नित्शे यांची धार्मिक व नैतिक टीका ही एका आमूलाग्र नव्या वैचारिक दृष्टिकोनातून केली गेलेली आहे. धर्मावर टीका करताना अनेकजण धर्माच्या एकूण बैठकीवर व रचनेवर टीका न करता धार्मिक म्हणवून घेणाऱ्या अनुयायांच्या वर्तनावर टीका करतात. अशा लोकांचा आक्षेप धर्म या संस्थेवर नसतो तर धार्मिकपणावर हक्क सांगून ढोंगीपणाचे वर्तन करणारांवर असतो. समजा, ढोंगीपणाने वागणारे हेच मंडळी जर अधिक कठोरपणे धर्माचे पालन करणार असतील तर त्यांचा धर्मावर आक्षेप असणार नाही. ' ख्रिस्ती धर्मीय तोंडाने ख्रिस्ताचे नाव घेतात पण प्रत्यक्षात ख्रिस्ताच्या शिकवणूकीच्या विरुद्ध वर्तन



अनुक्रमणिका



करतात वगैरे.' ( मार्क्स ), नित्शेंची भूमिका सर्वस्वी याच्याविरुद्ध आहे. नित्शेंच्या मते धर्म ही संस्थाच आता कालबाह्य झाली आहे. कारण ज्या कल्पनेच्या आधारे धर्म ही संस्था चालते ती परमेश्वराच्या अस्तित्वाची कल्पनाच आता नष्ट झाली आहे. नित्शे परमेश्वराची कल्पना नाकारतात त्याप्रमाणेच त्या कल्पनेच्या आधाराने गृहित धरण्यात येणाऱ्या नैतिक व इतर कल्पनाही विवाद्य मानतात. नित्शेंच्या समोरचा प्रश्न हा नव्या नैतिक धर्माची–प्रस्थापित नैतिक शास्त्रांच्या पलिकडे जाऊन नवीन परिस्थितीला सुयोग्य ठरेल अशा प्रकारच्या नव्या नैतिक शास्त्राची प्रस्थापना कशी करता येईल या प्रकारचा होत.

धार्मिक अथवा आध्यात्मिक विचारवंत अलौकिक प्रमाणाच्या आधारे जे नैतिक शास्त्र व मानवी जीवनाच्या आत्मसाफल्याचे चित्र रंगवितात ते अर्थात नित्शेना कधीच पटले नसते. हे सगळे विचारवंत ट्रान्सेन्डेंटल किंवा अलौकिक प्रमाण आधाराला घेऊन आपली नैतिक शास्त्रे तयार करतात. नित्शेना जीवनाचा विचार जीवनाच्याच मितीत व्हावा असे वाटत होते. याच सुमारास डार्विनने आपले उत्क्रांतीवादाचे तत्त्वज्ञान मांडले. उत्क्रांतीवादाने नित्शेना त्यांच्या तत्त्वज्ञानासाठी एक भक्कम आधार पुरविला. हा आधार प्रत्यक्षगत होता तशाच प्रकारे शास्त्रीय स्वरूपाचाही होता. त्या काळी उत्क्रांतीवादाचे तत्त्वज्ञान जर मांडले गेले नसते तर हा आधार नित्शेना स्वतःच शोधून काढावा लागला असता.

स्वतःच्या बौद्धिक भूमिकेसाठी आधार म्हणून नित्शेनी जरी डार्विनच्या तत्त्वज्ञानाची मदत घेतली असली तरी सामान्य भाषेत ज्याला उसनवारी म्हणतात तशी ही मदत नव्हती. कारण डार्विनवादाला त्यांनी आमूलाग्र नवी कलाटणी दिली होती. डार्विन उत्क्रांतीप्रक्रियेला एकमार्गी प्रक्रिया समजतात. म्हणजे असे की उत्क्रमित होत जाणे हा जणू सृष्टीचा स्वभावधर्म आहे आणि त्याप्रमाणे ही प्रक्रिया घडून आली आहे. अमिबा ते वानर आणि वानर ते नर ही सगळी उत्क्रांती गणिताचे कायद्याप्रमाणे घडून आली आहे. थोडक्यात उत्क्रांती ही एक यांत्रिक पद्धतीची प्रक्रिया आहे असे डार्विन मानतात. साहजिकच उत्क्रांतीला ते प्रगती–वरच्या दर्जाकडे जात राहाणे असेही मानतात. नित्शेंची भूमिका सर्वस्वी वेगळी आहे. नित्शे उत्क्रमण मानतात. पण ते यांत्रिक पद्धतीने घडून येते असे मानीत नाहीत. कारण तसे मानले तर उत्क्रमणाला प्र–गती, अधिक उच्च दर्जाच्या आयुष्याकडे जात राहणे असे मानावे लागेल. म्हणजेच सृष्टीच्या ठिकाणी मूलतःच एक संपन्न अशी विचारशक्ती असून ही विचारशक्ती योजनाबद्ध पद्धतीने आपले कार्य चालविते असे मानावे लागेल आणि तसे मानले की माणसाची नैतिक व इतरही सर्व प्रकारची उन्नती आपोआप व स्वाभाविकपणे घडून येईल असे मानणे भाग पडते. नित्शे अमिबा ते वानर आणि वानर ते नर ही वस्तुस्थिती मान्य करतात. परंतु यानंतरची उच्च अवस्था केवळ वाट

पाहिल्याने घडून येईल असे ते समजत नाहीत. उत्क्रांत होणे खालून वर जाणे असा सृष्टीचा कायदा आहे असे त्याना वाटत नाही. येथवर योगायोगाने प्रगती घडून आली पण येथून पुढेही ती तशीच घडत राहील असे मानावयास आधार नाही असे त्याना वाटते. तसेच माणसाच्या उच्चपणाच्या बाबतीत आजचा माणूस हा शेवटचा शब्द होय असेही त्याना वाटत नाही. काही प्रमाणात माणूस हा माणूस असला तरी अनेक बाबतीत आजही तो पशूसदृश्य आहे असे त्याना वाटते, आणि हे पशुपण काढून टाकून वरच्या अवस्थेकडे जायचे असेल तर येथून पुढे माणसाने स्वेच्छा वापरली पाहिजे असे ते म्हणतात. स्वतःची विचार व कल्पनाशक्ती वापरून त्याने स्वतःची नवी प्रतिमा आजच स्वतःच्या मनाशी पाहिली पाहिजे व त्या प्रतिमेबरहुकूम स्वतःचे विल्–टू–पॉवर राबवले पाहिजे असे त्याना वाटते. उद्याच्या आदर्श अवस्थेची गुरुकिल्ली विल्–टू–प्रॉवरच्या हाती आहे.

डार्विनच्या मताने माणसाची उत्पत्ती माकडापासून झाली आहे. नित्शे डार्विनचा हा निष्कर्ष कबूल करतात. परंतु त्याच्यापुढे जाऊन आणखी ते असे म्हणतात माणूस जरी माणूस असला तरी माणूस आणि माकड यांच्यातील फरक संख्यात्मक आहे. तो गुणात्मक बनावयास हवा. एका बाजूने माणूस माणूस वाटत असला तरी दुसरीकडून तो माकडच आहे. डार्विन हा फरक गुणात्मक समजतात. व उत्क्रांतीच्या त्या दोन स्वतंत्र पातळ्या होत असे समजतात. हा फरक डार्विन गुणात्मक मानीत असल्याने माणसाच्या नैतिक व सौंदर्यविषयक आचरणाचा आधार ते लौकिकातीत अलौकिक तत्त्वाच्या ठिकाणी पाहातात.

नित्शेच्या मते माणूस उत्क्रांतीप्रक्रियेचा परिणाम असल्याने व ही प्रक्रिया भौतिक असल्याने मूल्यांची बैठकसुद्धा भौतिकच हवी. डार्विन व नित्शेच्या भूमिकेतला हा पहिला फरक. दुसरा फरक असा की डार्विन उत्क्रांतीला प्रगतीसम मानतात. नित्शेना ते कबूल नाही. प्रगती ही मूल्यवाचक कल्पना आहे, उत्क्रांतीलाच प्रगती मानल्यास उत्क्रांतीला बरेवाईट कळण्याची भावी मूल्यदृष्टी आहे असे समजावे लागेल. ते अर्थात तर्कशास्त्रदृष्ट्या बरोबर नाही, प्रगतीच्या कल्पनेत योजनेचा भाग मोडतो. माणूस विचार करू शकतो. उद्या विचारात घेऊन आजच स्वतःची उद्यासंबंधीची भूमिका निश्चित करू शकतो. म्हणून स्वतःच स्वतःच्या आयुष्याला तो दिशा देऊ शकतो ( दिशा देईलच असे नाही. ) असे म्हणता येते. तेव्हा प्रगतीची शक्यता माणसाच्या बाबतीत आहे. निश्चिती मात्र नाही. तसेच प्रगती माणसाला शक्य आहे केवळ यांत्रिक प्रक्रियेला शक्य नाही.

उत्क्रांती म्हणजे प्रगती नाही. सतत खालच्या अवस्थेकडून अधिक उच्च अवस्थेकडे जात राहाणे असा गुणधर्म सृष्टीच्या ठिकाणी नाही. कारण खालची अवस्था आणि वरची अवस्था या शब्दातला भेद सृष्टीला कळण्यासारखा नाही.

तेव्हा प्रगत होत राहाणे असा कोठलाही कायदा सृष्टीच्या ठिकाणी असू शकत नाही. उत्क्रांती हा एक यांत्रिक व्यापार आहे. सतत बदलत राहाणारा. परंतु प्रत्येक बदल म्हणजे मागल्या अवस्थेची उच्च अवस्था असेलच असे सांगता येत नाही. प्रगतीसाठी प्रगतीची योजना आखावी लागेल. व नंतर इच्छाशक्ती वापरून ती योजना प्रत्यक्षात आणावी लागेल. उत्क्रांती व प्रगती या दोन्ही संकल्पनां-संबंधिचे नित्शेंचे विचार त्यांच्या सगळ्या समकालिनांपेक्षा अधिक तर्कशुद्ध आहेत. सृष्टी सतत वरच्या वरच्या अवस्थांप्रत जात आहे ( किंवा प्रगती हा सृष्टीचा नैसर्गिक स्वभाव आहे ) असे म्हणणे म्हणजे जड किंवा निर्बुद्ध सृष्टीवर मनुष्यबुद्धीचा हेत्वारोप करणे होय. तेव्हा परमेश्वराच्या प्रमेयाला नकार म्हणजे अलौकिकतावादाला नकार होय. तसेच इतिहास कसल्यातरी अंतिम निष्कर्षासाठी प्रयत्नशील आहे याही प्रकारच्या विचारसरणीना नकार होय.

सृष्टी नैतिक कायद्याप्रमाणे चालू आहे असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा परमेश्वर किंवा तसेच दुसरे अलौकिक बुद्धीतत्व सृष्टीच्या ठिकाणी कार्यरत आहे असे मानावे लागते. तरच स्वाभाविक व निसर्गसिद्ध प्रगतीच्या कल्पनेचा उलगडा होऊ शकेल. नित्शे मुळातच अशा प्रकारच्या दैवी किंवा अलौकिक तत्वाना नकार देतात. " इतिहासाची अंतिम सांगता " अशासारखे शब्द ऐतिहासिक प्रक्रियेला जणू स्वतःची विचारशक्ती असून त्या विचारशक्तीप्रमाणे ही प्रक्रिया चालू आहे असे ध्वनित करतात. नित्शेंच्या मते या प्रकारच्या वैचारिक बैठकी हा आपल्या विवक्षित वैचारिक घाटणींचा परिणाम आहे. उद्देश्य आणि विधेय किंवा कर्ता व विशेषणे याना धरूनच विचार करण्याच्या आपल्या सवयीमुळे प्रत्येक व्यापाराला कोणीतरी चालक असलाच पाहिजे असे आपले मन मानते आणि चालक असल्याने असा प्रत्येक व्यापार कोठल्यातरी निश्चित लक्ष्याकडे जात आहे असेही आपण समजतो, इतिहास ही एक प्रक्रिया असल्याने ही प्रक्रिया कोठल्यातरी अंतिम उद्दिष्टाकडे जात असल्याचे आपण मानतो व म्हणून ' इतिहासाची अंतिम सांगता ' अशासारखे प्रयोजनवाचक शब्दप्रयोग आपल्या तोंडून बाहेर पडतात.

नित्शे डार्विनचे उत्क्रांतीचे तत्व स्वीकारतात. साहजिकच मानवी मूल्यांच्या उगमाच्या व आधाराच्या वैचारिक स्पष्टीकरणासाठी आणि मूल्यांच्या समर्थनासाठीही त्याना भौतिक तत्वच शोधून काढणे भाग होते. डार्विन अशा प्रकारच्या प्रश्नात शिरतच नाहीत. कारण परमेश्वराच्या असण्यानसण्याच्या वादात न शिरता होती तीच मूल्यव्यवस्था ते मान्य करतात. नित्शेना तसे करता आले नसते. मूल्यांचा प्रश्न हा त्यांच्या बाबतीत सर्वात महत्वाचा प्रश्न होता.

नित्शे परमेश्वरावर विश्वास ठेवीत नाहीत. तशाच प्रकारे धार्मिक हेतुवादही ( Teleology )–उदा. सृष्टीव्यापार काही निश्चित हेतूसाठी चालू आहे ( मानवाची मुक्ती, परमेश्वराची प्राप्ती वगैरे )–ते स्वीकारू शकत नाहीत.

किंवहुना ऐतिहासिक सांगतेमध्येच आखिल मानवजातीचा उद्धार आहे अशा प्रकारचे ऐतिहासिक नियतीवादाचे तथाकथित शास्त्रीय पण ऐतिहासिक हेतुवादही ते मान्य करू शकत नाहीत. जर का ते धार्मिक वा ऐतिहासिक हेतुवादाची बैठक स्वीकारू शकते तर त्या बैठकीच्या आधारे व अंतिम प्रयोजनाच्या प्रकाशात नैतिक मूल्यांच्या प्रतिपादनाचा प्रश्न ते सोडवू शकले असते.

नित्शे यांची मूल्यविषयक भूमिका न–धार्मिक आणि न–इतिहासवादी आहे. त्यांचा मूलभूत आक्षेप धर्म आणि धार्मिक जातीच्या स्पष्टीकरणाला त्र आहे. तसेच व्यक्तीचे श्रेष्ठत्व अथवा ऐतिहासिक घटनेचे श्रेष्ठत्व इतिहासाच्या अंतिम फलितावर ठरते अशा प्रकारच्या सार्वत्रिक हेतुवादी भूमिकाही त्याना पटत नाहीत. त्यांच्या मते वैयक्तिक हे सार्वत्रिकापेक्षा अधिक खरे व अधिक महत्वाचे आहे. संपूर्ण ऐतिहासिक प्रक्रियेमुळें एकएकटया ऐतिहासिक घटनाना महत्व लाभते असे नसून एकएकटया ऐतिहासिक घटनांमुळे संपूर्ण इतिहासाला महत्व लाभते असे नित्शे म्हणतात. सारांश, अलौकिक व्यक्ती आणि अलौकिक घटना याना ते महत्वाचे मानतात. नित्शेंच्या मते एखाद्या (वैयक्तिक) घटनेला स्वतःचे महत्व असते किंवा स्वतःचे महत्व असत नाही. परंतु एखाद्या प्रक्रियेचा घटक म्हणून तिचे महत्व ठरत नाही. सार्वत्रिक नव्हे तर विशिष्ट महत्वपूर्ण होय.

नित्शे परमेश्वराचे अस्तित्व मानीत नाहीत. त्यामुळे परमेश्वरी कल्पनेच्या आधारे त्याना स्वतःचे नैतिकशास्त्र मांडता येत नाही. नित्शे उत्क्रांतीला स्वाभाविक हेतू आहे असेही मानीत नाहीत. म्हणून हेतुवादी प्रतिपादनांच्या आधारेही त्याना त्यांचे नैतिकशास्त्र मांडता येत नाही. नैतिकशास्त्रासंबंधिची त्यांची भूमिका लौकिकवादी तरीही अ–इतिहासवादी आहे. ते म्हणतात की, " मानवजातीच्या आयुष्याचे खरे समर्थन मानवजातीच्या इतिहासात नसून ते मानवजातीत जे श्रेष्ठ आणि अलौकिक पुरुष जन्म घेतात त्या नरश्रेष्ठांमध्ये आहे. "

आता गंमत अशी आहे की श्रेष्ठ आणि त्याच्या विरुद्धार्थी कनिष्ट हे दोन्ही शब्द मल्यवाचक असल्याने हे मूल्यवाचक निष्कर्ष ते कोठल्या आधारे काढतात हे तपासावे लागेल. नित्शेंच्या दृष्टीने माणूस हादेखिल इतर पशूंसारखाच एकपशू आहे. कारण तोही उत्क्रांत आहे. त्याच्यात आणि इतर पशूत फरक असला तर तो गुणात्मक नसून संख्यात्मक आहे. जगत्पित्या परमेश्वराने पशुपक्षीजलचरादी प्राण्याना इच्छामात्रेकरून निर्माण केल्यानंतर त्यांच्यावर राज्य करण्यासाठी स्वतःच्या प्रतिबिंबरूपाने माणसाला सर्वात शेवटी निर्माण केले ही कल्पना त्याना पोरकट वाटते. तथा कोठल्याही बाजूने पाहिले तरी नित्शेना अलौकिक तत्वाच्या आधारे मानवाचे स्पष्टीकरण व समर्थन देता येण शक्य नसते. मग हे स्पष्टीकरण व समर्थन ते कशाच्या आधारे देतात ?

नित्शे म्हणतात की माणूस पशू आहे पण तो थोडचा वेगळचा प्रकारचा पशू आहे. आणि तो संपूर्ण पशू नाही. तो काही प्रमाणात का होईना पशुत्वाच्या पलिकडे गेला आहे. त्याला विचार करता येतो. त्याला काळ मोजता येतो. त्याला स्मरणशक्ती आहे. तो स्वतःला वचन व शब्द देऊ शकतो. प्रतिज्ञा करू शकतो. वचन व शब्द पाळण्यासाठी न विसरता मेहनत करू शकतो. पशू केवळ नैसर्गिक सहजप्रवृत्तींच्या मर्यादातच जगतो. माणूस या प्रवृत्तीना आवर घालू शकतो. त्यांचे रूपांतर अधिक उच्च प्रकारच्या प्रवृत्तीत करू शकतो. माणूस पर्यावरणाशी संपूर्णपणे बद्ध नाही. सहजप्रवृत्तींच्या रिजिड सक्तीपासून तो मुक्त आहे. उदात्त आणि यशस्वी आयुष्याची कितीतरी चित्रविचित्र काल्पनिक चित्रे तो स्वतःच्या मनाशी रंगवू शकतो. त्या चित्रांबरहुकूम स्वतःला घडविण्यासाठी प्रयत्नशील राहू शकतो. माणसाचे इसेन्स काय, त्याचे खरे रूप काय हे आधीपासून ठरविता येत नाही. कारण जगण्याच्या कोठल्याही क्षणी स्वतःच्या सगळचा भूतकाळाला नकार देऊन जीवनाची आमूलाग्र नवी घडण तो घडवू शकतो. दगड आधी दगड, मधे दगड व शेवटीही दगडच राहाणार असतो. वडाचे झाड आधी वडच असेल आणि मरतानाही वड म्हणूनच मरेल. त्याचा पिंपळ होणार नाही. पण एखादा मनुष्य जीवनाच्या प्रारंभी दरोडेखोर असू शकेल. आणि मरताना मात्र साधुसंत म्हणून मरेल. एकच वाल्या आयुष्यातली काही वर्षे खुनी दरोडेखोर असू शकतो आणि शेवट महर्षी वाल्मिकी म्हणून मरू शकतो. वडाचे 'बी' पेरून बदामाचे झाड अपेक्षिता येत नाही. झाडाची बी पाहून त्या बीतून कोठले झाड उत्पन्न होईल ते सांगता येते. पण एखादे अर्भक पाहून ते अर्भक पुढे कोण होईल हे सांगता येणार नाही. माणसाचा इसेन्स म्हणजे त्याचे अस्तित्व. हे आधी ठरून येत नाही. ते प्रत्येकजण स्वतःच्या जगण्यातून जमा करतो.

माणूस आणि पशू या दोघातला हा मूलभूत फरक होय. पशू जन्मल्या-पासून मरेपर्यंत पशूच राहील. माणसाच्या बाबतीत अगणित स्थित्यंतरे संभवतात. माणूस आयुष्याच्या कोठल्याही क्षणी संपूर्ण आयुष्याला कलाटणी देऊ शकतो. मी 'असा' होईन, 'तसा' राहाणार नाही असे म्हणू शकतो. त्याला स्वतःचा आयुष्यक्रम निवडता येतो. बाह्य परिस्थितीला ठामपणे 'नाही' असे म्हणता येते. आयुष्यक्रमाच्या अनेक वेगवेगळचा घाटणी त्याच्यासाठी उपलब्ध आहेत. त्यातील कोठीलिही घाटणी निवडून तिच्यावर तो आपली कल्पना व इच्छाशक्ती केंद्रित करू शकतो. तो स्वतःला मागे टाकून स्वतःच्या पलिकडे जाऊ शकतो. म्हणूनच आत्मसाफल्य या शब्दाना त्याच्या बाबतीत काही अर्थ असू शकतो. पशूच्या बाबतीत आत्मसाफल्य, आत्मपरिपूर्ती हे शब्द निरर्थक आहेत. पर्यावरणाशी जमवून घेता-घेता पर्यावरण स्वतःशी जमेल अशा प्रकारे बदलून घेणे असे काहीच पशूच्या बाबतीत संभवत नाही.





पशू कदाचित आपापसात बोलत असतील. त्यांच्यापाशी भाषाही असेल. पण त्याना प्रतीकांचा वापर माहित नाही. शारिरीक गरजा भागविण्याचा काळ सोडल्यास आयुष्याचा बाकी सगळा काळ माणूस प्रतीकांच्या विश्वात काढतो.

माणूस स्वत:च स्वत:ला अनेक प्रकारचे प्रश्न विचारू शकतो. म्हणजेच बाहेरच्या जगाच्या बाबतीत थोडा काळ का होईना पण अलिप्त निरिक्षकाची भूमिका घेऊ शकतो. मनाने स्वत:ला पर्यावरणापासून अलग करू शकतो. पशू असे करू शकत नाही. पशू पर्यावरणाला 'नाही' असे म्हणू शकत नाही. पशूच्या बाहेरचे जग केवळ पर्यावरण आहे. माणूस त्याच पर्यावरणाचे रूपांतर 'स्वतःच्या जगात' करू शकतो. 'हे माझे जग' असे उद्‌गार फक्त माणसालाच शक्य आहेत.

बाहेरचे पर्यावरण माणूस सुसंबद्ध संरचनात लावतो. किंवा वास्तव तो स्ट्रक्चर्ड करतो. म्हणजेच बाहेरच्या मूढ वास्तवाला तो त्याच्या रागालोभाच्या, द्वेषमत्सराच्या, कामकाजाच्या जगात आणतो. तसेच या संरचनांच्या बाबतीत वेगवेगळ्या वेळी तो वेगवेगळ्या भूमिका घेऊ शकतो. नव्हे एकाच परिस्थितीच्या — संरचनेच्या बाबतीत एकाच वेळी तो एकापेक्षा अधिक भूमिकाही घेऊ शकतो. अर्थात यामुळे माणसाचे जग आत्यंतिक संदिग्ध बनते ही गोष्ट खरी. परंतु त्याचबरोबर ते अधिक अर्थपूर्ण, अधिक वैविध्यपूर्णही बनते.

पर्यावरणाच्या बाबतीत पशूच्या प्रतिक्रिया यांत्रिक आहेत. माणसाच्या प्रतिक्रिया अधिक लवचिक, मोकळ्या आहेत. सहजप्रवृत्तीना माणसाने काही प्रमाणात का होईना पण वळण लावले आहे. ताब्यात आणले आहे. स्वत:च्या प्रतिमांबरहुकूम वागावयास लावले आहे. एकाच वस्तुस्थितीच्या बाबतीत दोन वेगवेगळ्या प्रसंगी मनुष्य दोन वेगवेगळ्या प्रकारचे वर्तन करू शकतो. तात्पर्य, बाह्य परिस्थितीशी तो एकरूप होईल किंवा अलिप्त, तटस्थ बनेल. पशूला कोठलिही प्रतिक्रिया पुढे ढकलता येत नाही. तो थांबू शकत नाही. पशूचे होय किंवा नाही तत्काळ घडून येते. माणूस तेच पुढे ढकलू शकतो. म्हणूनच वेगवेगळ्या वेळी एकच वस्तू माणूस वेगवेगळ्या प्रकारे वापरू शकतो आणि हे सगळे वेगवेगळे उपयोग स्वत:च्या ध्यानात ठेवू शकतो. टूल्स किंवा हत्यारे ही माणसाच्या बाबतीतच शक्य असू शकतात. नैसर्गिक वस्तूचा हत्यारासारखा उपयोग माकडही करू शकते. पण माकडाच्या बाबतीत ते हत्यार हत्यार असत नाही. कारण त्या वस्तूचे विविध उपयोग माकडाच्या ध्यानात येत नाहीत. माकडाला फक्त त्या त्या प्रसंगीचा अर्थ वा उपयोग माहित होतो. त्याच्या पलिकडे त्याची कल्पनाशक्ती आणि स्मरणशक्ती जाऊ शकत नाही. झाडाच्या फांदीचा उपयोग प्रसंगी ते काठीसारखा करील. पण आता फांदी हा अर्थ त्याच्या ध्यानात नाही. ते त्या फांदीकडे फक्त काठी म्हणूनच आता

पाहील. माणूस फांदी, काठी, दंडुका, सरण हे सगळे अर्थ एकाच वेळी ध्यानात ठेवू शकतो. म्हणून ती वस्तू त्याच्या बाबतीत हत्यार असते. हे त्याला जमते कारण त्याला कोठल्याही वस्तूचे रूपांतर प्रतीकात करता येते.

फक्त माणसाच्याच बाबतीत कोठल्याही गोष्टीला एकापेक्षा अधिक अर्थ प्राप्त होऊ शकतात. ती गोष्ट संदिग्ध बनू शकते. तिचे हत्यार होऊ शकते. **भावी उपयोगाच्या वस्तू** या दृष्टोकोनातून फक्त माणूसच जगातल्या वस्तूंकडे पाहू शकतो. एखाद्या गोष्टीचा उद्याकरताचा वापर माणसालाच समजू शकतो. आजच्या पलिकडे मनाने जाऊन उद्याची वा त्यानंतरच्या दिवसाची कल्पना फक्त माणूसच आजच्या आजदेखिल स्वत:शी करू शकतो. काल आणि आज, आज आणि उद्या या प्रकारचे फरक फक्त माणसालाच कळू शकतात. पशू काळाच्या फक्त एकाच मितीवर जगणार असतो. माणूस अनेक मितींवर जगू शकतो. वस्तुनिष्ट किंवा वास्तव काळ, व्यक्तिनिष्ट काळ, सापेक्ष काळ अशा अनेक मिती त्याला उपलब्ध आहेत. या मिती वापरता आल्यानेच घट्ट आणि मूढ पर्यावरणाचे रूपांतर माणसाला त्याच्या स्वत:च्या वैयक्तिक जगाच्या स्वरूपात करता येते. माणसाचे पाहाणे करणात्मक आहे. ते केवळ निष्क्रिय नोंद घेणे नाही. माणूस जेव्हा जगाकडे पाहातो तेव्हा त्या जगातल्या तपशिलांची तो केवळ निष्क्रियपणे नोंद घेत नाही. तर मनाने पुढे होऊन ते तपशिल तो उलगडू पाहातो. स्वत:साठी त्यांचा अर्थ निश्चित करू पाहातो. माणसाचे पाहाणे सक्रिय आणि धारणात्मक आहे. माणसाच्या पाहाण्याचे दोन भाग करता येतील. एक भाग केवळ नजरेने नोंद घेण्याचा –Seeing चा; दुसरा नोंद घेऊन लक्ष्यपूर्वक अर्थात्मकतेने पाहाण्याचा –Noticing चा. पहिला भाग केवळ संवेदनात्मक असतो. तर दुसऱ्यात 'वाटणे' असते.

माणसाचे पाहाणे पाहाण्याच्या विषयाबरोबरच्या केवळ एकरूपत्वाचे नसते. ते ऑब्जेक्टिव्ह, वस्तुनिष्ट म्हणजे पाहाण्याच्या विषयापासून मनाने बाजूला होऊन घडणारे आहे. याचाच अर्थ असा की ज्या काही संवेदना आपणापर्यंत येतात त्या मनातल्या मनात जुळवून त्यांच्यातून काही ना काही सलग अर्थ आपण काढतो. कॅओसचे–अस्ताव्यस्ततेचे रूपांतर अशा प्रकारे आपण कॉस्मॉसमध्ये–व्यवस्थित आकारिकतेत करतो. माणूस पशू असला तरी तो निखळ पशू नाही. तो पशूपेक्षा श्रेष्ठ आहे. तो अर्थाच्या चौकटी तयार करतो. तशा चौकटीत वावरतो. उत्क्रांती-क्रमात इतर अनेक प्रकारच्या प्राण्यांबरोबरच उत्क्रमित झालेला एक प्राणी म्हणून जरी तो पशूच्याच वर्गात मोडतो तरी वरीलप्रमाणे स्वत: रचलेले अर्थ जगणारा, प्रतीके वापरणारा प्राणी म्हणून तो पशूपेक्षा थोडा अधिक वरचा प्राणी आहे.

गेल्या हजारो वर्षांच्या उत्क्रांतीक्रमात मानवजात अगणित प्रकारच्या पण ठराविक अनुभवक्रमातून गेली आहे, अनेक प्रकारच्या भूमिका जगली आहे. या

भूमिका म्हणजे तेवढे आत्मसाफल्याचे मार्ग होत. यापैकी कोठलिही भूमिका माणूस निवडू शकतो. त्या भूमिकेनुसार स्वत:च्या आयुष्याला वळण देऊ शकतो. याचा गर्भित अर्थ असा की पशूप्रमाणेच माणूस हादेखिल जरी सहजप्रवृत्तींचा प्राणी असला तरी या प्रवृत्तींवर तो ताबा मिळवू शकतो. सहजप्रवृत्तीना जर आपण शारिरीक वळणे असे नाव दिले तर आपण असे म्हणू शकतो की या शारिरीक वळणाना माणूस त्याच्या इच्छेबरहुकूम वाकवू शकतो. शारिरीक वळणांचे रूपांतर मानसिक वळणात–कोठल्या प्रसंगी कोठले वर्तन करावे याचे मार्गदर्शन करू शकणाऱ्या मानसिक आराखड्यात झाले आहे. याच मानसिक आराखड्याना किंवा वळणाना युंग आर्किटाइप म्हणतात.

माणूस केवळ शारिरीक वळणांप्रमाणेच जर जगत असता, तर स्वातंत्र्य. स्वेच्छा इत्यादी शब्दाना काही अर्थच राहिला नसता. पशूंच्या बाबतीत स्वातंत्र्य वगैरे शब्द संपूर्णतया निरर्थक असतात, परंतु माणसाची शारिरीक वळणे प्रतीकांच्या मध्यस्थीने त्याच्या मानसिक वळणांच्या ताब्यात येऊ शकत असल्याने माणसाच्या बाबतीत स्वातंत्र्य हा शब्द अर्थपूर्ण ठरतो. माणूस गाभ्यात स्वतंत्र आहे. कारण त्याला स्वत:चे आयुष्य निवडता येते. त्याला निवडीची मोकळीक आहे, तो कोठल्याही एकाच प्रकारच्या आयुष्याला बद्ध नाही. तो त्याचे आयुष्य पसंत करू शकतो. स्वेच्छापूर्वक प्रयत्न करून स्वत:चा आगळा ‘स्व’ निर्माण करण्याचे स्वातंत्र्य त्याला आहे. आणि हे स्वातंत्र्य कोणीही त्याच्यापासून हिरावून घेऊ शकत नाही. एवढेच नव्हे तर त्याची स्वत:ची इच्छा असली तरी त्याला स्वत:लाही ते टाकून देता येत नाही.

स्वातंत्र्याची निवड म्हणजे एक प्रकारे मूल्याचीच निवड होय. माणूस स्वतंत्र आहे म्हणजे सतत तो स्वत:च्या पलिकडे जातो आहे. निदान जाऊ शकतो आहे प्रत्येक क्षणी तो अर्थ जगणार आहे आणि अर्थ जगणार म्हणून मूल्य जगणार आहे. माणसाने ठरविले तर तो कोठलेही वळण स्वत:च्या आयुष्याला देऊ शकतो. स्वत:च स्वत:ला घडवू–निर्मू शकतो. नित्शेंचा अतिमानव म्हणजे अशा घडण्याची एक आदर्श प्रतिमा होय. एक प्रतीक.

अतिमानव हे नित्शेप्रणीत मूल्यवाचक मार्गदर्शक तत्व होय. अतिमानव म्हणजे महामानव. महा हे शब्द मूल्यसूचक असल्याने त्यांचे स्पष्टीकरण द्यावे लागेल. महामानव का ? कशासाठी ? नित्शे परमेश्वरच मानित नसल्याने परमेश्वराची कल्पना आधाराला घेऊन त्याना श्रेष्ठत्व–कनिष्ठत्व सांगता येणार नाही. नंतर सृष्टीव्यापारसुद्धा ते सहेतुक असतो असे मानित नसल्याने अथवा सृष्टीव्यापाराच्या ऐतिहासिक मांडणीची कल्पनाही त्याना मान्य नसल्याने त्याही कल्पनांच्या आधारे त्याना मूल्यवाचक निकष बांधता येणार नसतात. सृष्टी-व्यापार सहेतुक असतो असे जर का ते मानू शकले असते तर नैसर्गिक प्रगती हा

सृष्टीचा स्वभाव होय असे ठरवून प्रगतीच्या तत्वावर मूल्यांची कसोटी ते निश्चित करू शकले असते. कार्ल मार्क्सप्रमाणे समजा, नित्शे जर ' वर्गहीन समाजाला ' इतिहासाचा अपरिहार्य अंतिम टप्पा व सगळ्या प्रकारच्या संघर्षांचा शेवटचा निचरा मानू शकले असते तर ' वर्गहीन समाजाच्या ' कल्पनाचित्रावर आधारीत मूल्ये त्याना सुचविता आली असती. पण यापैकी काहीच ते गृहित धरीत नसल्याने व परमेश्वराचा अंत झाला आहे आणि सृष्टीव्यापार कोठल्याही प्रकारे सहेतुक नाही असे ते मानीत असल्याने मूल्यांसाठी या सर्वांव्यतिरिक्त वेगळी कसोटी त्याना शोधून दाखवावी लागते.

परमेश्वराच्या अस्तित्वासाठी किंवा इतिहासक्रमाच्या विवक्षित अर्थाच्या अंतिम सांगतेसाठी अशा दोन्हीहीसाठी कसल्याच प्रकारचा वस्तुनिष्ट पुरावा आपणाला सापडण्यासारखा नाही. इतिहासाचा अर्थ लावताना आपण गतकालिन वा चालू घटना विचारात घेऊ शकतो. परंतु या घटनाक्रमांपैकी काही ठराविक घटनाक्रम वळेच बाजूला काढून व त्यात एक काल्पनिक सुसंगतता दाखवून तीच सुसंगतता अशा अशा प्रकारे शेवटास जाणार आहे या प्रकारचे निष्कर्ष जरी कितीही चित्तवेधक वाटले तरी ते तर्कशास्त्रीय दृष्टया समर्थनीय नसतात. अशा प्रकारचे भाकिते म्हणजे इतिहासशास्त्राचेच नव्हे तर तर्कशास्त्राचेही विडंबनच होय. असे निष्कर्ष म्हणजे समोरच्या पुराव्याने दिलेल्या स्वातंत्र्याचा गैरफायदा घेणे होय.

नित्शेंचे तत्वज्ञान डार्विन यांच्या उत्क्रांतीक्रमाच्या निष्कर्षांवर आधारित असल्याने आणि उत्क्रांतीप्रक्रिया ही एक भौतिक प्रक्रिया असल्याने स्वतःची मूल्य-प्रणाली मांडताना नित्शेसुद्धा अतिभौतिकाऐवजी भौतिकाचा आधार घेतात. नित्शे म्हणतात की ही सगळी सृष्टी म्हणजे विल्–टू–पॉवरचा खेळ आहे. खालपासून वरपर्यंत आणि अमिबापासून माणसापर्यंत सर्वत्र विल्–टू–पॉवर विखुरलेले आहे. या सृष्टीतील प्रत्येक रचना अधिकाधिक पॉवर आत्मसात करू पाहात आहे. पॉवर म्हणजे फोर्स, अनिबंध ऊर्जा. पण ही ऊर्जा अनिबंध–फॉर्मलेस असली तरी ती केवळ ऊर्जा नसून ती वर्चस्वाची इच्छा करणारी ऊर्जा आहे. किंवा अधिक बरोबर म्हणजे वर्चस्वाची–फॉर्मची इच्छा म्हणजेच ती ऊर्जा होय. तेव्हा पॉवर कल्पना आधाराला घेऊन पॉवरच्या तत्वाच्या मदतीने नित्शे मूल्याचा प्रश्न सोडवू पाहातात.

सृष्टीत सर्वत्र विल्–टू–पॉवर किंवा एक वेगवान, अनिर्बंध फोर्स भरून राहिला असून जे जे काही जगात दिसते वा घडते ते ते सर्व या फोर्समुळे घडत असते अशी नित्शेंची सर्वसाधारण विचारसरणी आहे. या फोर्सची विशेष लक्षणे दोन–एकीकडे ती एक अनिर्बंध आणि आवेगवान शक्ती आहे. तर दुसरीकडे तीच फॉर्म वा आकार घेऊ पाहाणारी शक्ती आहे. या दोन्ही प्रवृत्ती मिळून जो काही फोर्स होतो ते म्हणजे विल्–टू–पॉवर.



अनुक्रमणिका

विल्–टू–पॉवरला आधारभूत मानून नित्शे मूल्यांचा विचार करू पाहातात. विल्–टू–पॉवर हे नैसर्गिक व भौतिक तत्व आहे. परमेश्वराप्रमाणे ते अतिभौतिक तत्व नाही. हा एक फोर्स असल्याने आपण ज्याला नैतिक बुद्धी म्हणतो ती बुद्धी त्या फोर्सला नाही. ती बुद्धी हा माणसाचा विशेष आहे. मात्र खुद्द माणूस हे विल्–टू–पॉवरचे रूपांतर–पॉवरचे इंटरप्रिटेशन आहे.

अनेक तत्वज्ञानांमध्ये जीवनाचे साफल्य जीवनाबाहेर शोधण्याचा प्रयत्न होतो. ही तत्वज्ञाने जीवनाचे अधिष्ठान जीवनाबाहेरील कशात तरी पाहातात आणि हे 'काहीतरी' प्राप्त करणें म्हणजे जीवनाची सफलता किंवा सत्याची प्राप्ती मानतात. मिळविणे म्हणजे फक्त बाहेरूनच मिळविणे अशी त्यांची धारणा असते. परमेश्वर, योजनाबद्ध निसर्ग किंवा न्यायी इतिहास या अशा जातीच्या काही संकल्पना. या संकल्पनात सृष्टीचे व जीवनाचेही स्पष्टीकरण सृष्टीबाहेरच्या तत्वाच्या आधारे केलेले असते. वस्तुतः ह्या प्रकारच्या सर्व संकल्पना म्हणजे बौद्धिक सोयीचे प्रकार असतात. आपली बौद्धिक चौकट तर्कशुद्ध पद्धतीने आणि व्यवस्थित प्रकारे मांडता यावी म्हणून त्यांचा आधार आपण घेतलेला असतो. पण त्या संकल्पना म्हणजे वस्तुस्थिती नव्हे. मात्र या प्रकारच्या तत्वज्ञानात त्याना वस्तुस्थितीची किंमत आलेली असते. मग जेव्हा कधी या वस्तुस्थितीची तपासणी सुरू होते किंवा सत्याचा शोध चालू होतो तेव्हा ही वस्तुस्थिती खरोखर वस्तुस्थिती नाही. ती केवळ गृहिते आहेत असे घ्यानात येऊन मनुष्याचे मन विचाराच्या एकदम दुसऱ्या टोकाला जाते. 'जगात काहीच खरे नाही' सारे शून्य हे उद्गार याचेच द्योतक असतात.

नित्शे अलौकिक वा अतिभौतिक भूमिका न घेता भौतिक आणि व्यवहारी बुद्धीला पटेल अशी भूमिका घेतात. सृष्टीमध्ये सर्व थरावर संघर्ष, विरोध आणि विरोधातून नवजनन आपल्या दृष्टोत्पत्तीस येते. याच निरिक्षणावर आधारित ते विल्–टू–पॉवरचे आपले तत्त्वज्ञान मांडतात. विल्–टू–पॉवरला दोन बाजू आहेत. आणि या दोन बाजू परस्परांवर कुरघोडी करण्याचा प्रयत्न करतात व जेव्हा त्यात संतुलन होते तेव्हा निर्मिती दृष्टीस पडते.

पारंपरिक विचारात या दोन्ही बाजू पृथक् व स्वतंत्र आहेत असे दर्शविले जाते. पुरुष आणि प्रकृती, देव आणि दैत्य, सुष्टत्व आणि दुष्टत्व, भांडवलदार आणि श्रमजीवी ही त्यांचीच काही जगप्रसिद्ध उदाहरणे. येथे अर्थात आपण आपल्या मनच्याच गुणधर्मांचा हेत्वारोप मूलतः मूढ किंवा सुष्टत्वदुष्टत्वापलिकडे असणाऱ्या सृष्टीवर करीत असतो. मनुष्यामध्ये सुष्टत्व आणि दुष्टत्व आढळते. तेव्हा सृष्टीमध्येही तशी दोन वेगवेगळी तत्वे अस्तित्वात असली पाहिजेत असे आपण मानतो.

नित्शेंचा भर व्यवहारी बुद्धीवर असल्याने आपले सगळे विवेचन ते सामान्य बुद्धीला पटेल अशा प्रकारे चालवू पाहातात. सृष्टी मूलतः मूढ आहे, किंवा तिला सुष्टपणा–दुष्टपणा कळत नाही ही गोष्ट ते प्रारंभीच मान्य करतात. परंतु ती आहे. तिच्या असण्याबद्दल आपण शंका घेऊ शकत नाही. तेव्हा 'असणे' हा तिचा प्रधान गुणधर्म असला पाहिजे असे ते म्हणतात. असणे हे अर्थातच आकाराच्या स्वरूपातील असणे असते. हे असणे ज्या फोर्सचे आहे त्या फोर्सला ते विल्–टू–पॉवर हे नाव देतात. विल्–टू–पॉवर अर्थातच माणसाला अभिप्रेत असणाऱ्या सुष्टत्व–दुष्टत्वाच्या कल्पनांच्या पलिकडचे आहे. किंवा आधीचे आहे.

जगात सर्वत्र आपणाला पॉवर आणि त्या पॉवरची ओढ दिसून येते. निदान सजीव सृष्टीमध्ये तरी सर्व प्रयत्न पॉवरसाठी चालल्याचे दिसून येते. जर पॉवर हे सर्व सृष्टीचे, सर्व जीवनाचे अधिष्ठान असेल तर पॉवरला नको म्हणणे म्हणजे जीवनालाच नको म्हणणे. खुद्द पॉवर अपायकारक असू शकत नाही. पॉवरचे वैयक्तिक आविष्कार अपायकारक किंवा त्रासदायक असू शकतात. सृष्टीच्या किंवा जीवनाच्या मुळाशी पॉवरची आकर्षणशक्ती असल्याने पॉवरची इच्छा म्हणजे जीवनाची–अधिकत्तम जीवनाची इच्छा होय.

पॉवर वाईट नाही. पॉवरचा वापर वाईट असू शकतो. कधी पॉवरची झळ लागून दुर्बल दुखावलेही जाऊ शकतात. पण ते बुद्धिपुरस्सर केले गेलेले नसते. पॉवर ही पॉवरप्रमाणेच वागू शकते. जशी वीज वीजेप्रमाणे वागू शकते तशी. याचा अर्थ नित्शेना जुलूमजबरदस्ती मान्य होती असा नव्हे. त्याना फक्त असे म्हणायचे असते की दौर्बल्यापेक्षा सामर्थ्य हे केव्हाही स्तुत्य आहे. केवळ दुबळेपणा-पोटी जे लोक अन्यायाचा प्रतिकार न करता गप्प बसतात ते त्यामुळे अधिक सोशीक, अधिक सज्जन व चांगले बनत नाहीत. ते मनातल्या मनात जळत राहातात. आणि अधिक क्रूर बनतात. खरे सामर्थ्य क्रूर नसते. सामर्थ्यवान आणि दुर्बल दोघातही एकच विल्–टू–पॉवर कार्य करीत असते. पण एकाच्या ठिकाणी तिचे प्रमाण अत्यल्प आहे तर दुसऱ्याच्या ठिकाणी तेच भरपूर आहे. अशा परि-स्थितीत अत्यल्प पॉवरवाला अधिक पॉवर असणारावर मात करण्यासाठी नैतिक मूल्यांचीच फिरवाफिरव करतो आणि त्याच्या पॉवरचा प्रतिकार न करता शांत राहून त्यालाच उलट लाजवू पाहातो. जणू तो म्हणत असतो की 'पाहा, मी किती शांत आहे. इतका त्रास मला दिला गेला तरीही मी हात वर उचलला नाही. ' किती मी श्रेष्ठ ! '

जीवन म्हणजे वर्चस्वेच्छा. विल्–टू–पॉवरच्या आकारांचा आपापसातला अखंड संघर्ष. संघर्ष हे सर्व प्रकारच्या जीवनाचे स्थायी लक्षण आहे. संघर्ष टाळून देता येत नाही. संघर्ष नाही म्हणजे जीवन नाही. मात्र खुद्द विल्–टू–पॉवरला मानवी नैतिक बुद्धीसारखी नैतिक बुद्धी नाही. म्हणून विल्-टू-पॉवर सतत वरच्याच

दिशेने जात राहील असे म्हणता येणार नाही. नैतिक वृद्धी माणसाला आहे. माणूस सतत वर जात राहू शकतो. नैतिक पूर्णत्व माणसाला शक्य आहे. विल्–टू–पॉवर हा केवळ फोर्स आहे. या फोर्सला वळण देण्याचे काम ज्याचे त्याने करावे.

विल्–टू–पॉवरमध्ये अभिप्रेत असलेला संघर्ष स्वतःचा स्वतःबरोबर असू शकेल. किंवा इतर विल् बरोबरचा असू शकेल. विल् स्वतःला आकार देण्याचा प्रयत्न करील. किंवा इतर विल्ना आकार देण्याचा प्रयत्न करील. इतर विल्ना आकार देण्याचा प्रयत्न ही तुलनेने सोपी गोष्ट आहे. स्वतःला आकार देण्याचा प्रयत्न ही त्या मानाने कठीण गोष्ट आहे. याचाच अर्थ असा की पहिल्या विल्च्या ठिकाणी पॉवरचे प्रमाण कमी आहे. दुसरे विल् अधिक सामर्थ्यवान आहे. म्हणून त्या विल्चा संघर्षही अधिक प्रखर आहे. येथे अर्थात आत्मसंघर्ष, या आत्मसंघर्षातून शेवटी आत्मनिर्माण सिद्ध होते. विल्–टू–पॉवर हा फोर्स असल्याने हा फोर्स सतत स्वतःच्याच पलिकडे जाऊ पाहात असतो. माणूस हासुद्धा विल्–टू–पॉवरचा बनला असल्याने त्यानेही सतत स्वतःच्या पलिकडे आणि तेमुद्धा जाणीवपूर्वक जावे असे नित्शेना वाटते. ' सेल्फ–ओव्हरकमिंग ' हा नित्शेंचा श्रेष्ठत्वाचा निकष होय. " Man is something that should be surpassed " स्वतःला काबूत आणण्याऐवजी जो केवळ इतराना काबूत आणण्यासाठी झटत असतो तो तेवढ्या प्रमाणात दुर्बल ठरतो. ( नित्शे )

विल्–टू–पॉवरचे आविष्कार अगणित आहेत. स्वतःवर, स्वतःच्या इच्छाशक्तीवर ताबा मिळवू पाहाणारा तपस्वी म्हणजेही विल्–टू–पॉवर आणि इतरांवर, त्यांच्या जीवित–वित्तावर ताबा मिळवू पाहाणारा हुकूमशहा म्हणजेही विल्–टू–पॉवरच. एक स्वतःला शरण आणण्यासाठी झटत असतो दुसरा इतराना. विल्–टू–पॉवरचाच विचार करता ते वाईट नाही वा चांगलेही नाही. म्हणजे खुद्द पॉवर अनिष्ट नाही. पण पॉवरमुळे मनुष्य चांगला बनतो अथवा वाईट बनतो. मात्र पॉवरमुळे मनुष्य वाईट बनत असला तरी ज्यांच्यापाशी पॉवर नाही ते त्याच्याहीपेक्षा वाईट बनतात. कारण ते ज्याच्यापाशी पॉवर आहे त्याचा मनातल्या मनात राग करतात. त्याच्यावर कुरघोडी करण्यासाठी आडमार्ग शोधू पाहातात. कारण पॉवर ही पॉवरसारखीच वागणार असते. मग तिचे प्रमाण कमी असो वा अधिक. पॉवर वर्चस्वाची इच्छा करते. जेथे तिचे प्रमाण कमी असेल तेथे तिला सरळ मार्गाने ती करता येत नाही. मग ती आडमार्ग शोधते. पण शेवटी पॉवरप्रमाणेच वागते. सामर्थ्यातून मनुष्ये उदात्त बनतात. सामर्थ्यवान उदात्त असू शकतो. पण दुर्बल काही झाले तरी उदात्त असू शकत नाही. तो मत्सरी, मनातल्या मनात चांगल्याचा द्वेष करणाराच फक्त असू शकतो. झालेच तर सामर्थ्यवानाला तो काही [illegible] शकतो. जगात दुर्बल आणि निःसत्व लोकच अधिक जुलमी, अरेरावी आणि क्रूर वागणारे असतात. दुर्बलच सामर्थ्याचे सोंग आणण्यासाठी

क्रौर्याने वागतात. सामर्थ्यवान कोणाला भीत नाही. आणि अधिक महत्वाचे म्हणजे तो कोणाला भिववूही पाहात नाही. दुर्बल स्वतः भितात आणि स्वतःच्या भीतीवर मात करण्यासाठी इतराना भिववू इच्छितात. नित्शे म्हणतात की, "कोणाला भिण्याऐवजी आणि कोणाचा द्वेष करू पाहाण्याऐवजी स्वतः नष्ट होऊन गेलेले अधिक बरे. पण त्याहीपेक्षा अधिक महत्वाचे म्हणजे कोणाच्या भीतीचा व द्वेषाचा विषय होण्याऐवजी आपण स्वतःच नष्ट होऊन गेलेले त्यापेक्षाही अधिक बरे होय. "जगात सर्वात वाईट मनुष्य कोठला?—जो नेहमी दुसऱ्याला शरमिंदा करू पाहातो, खजील करू पाहातो तो सर्वात वाईट मनुष्य होय." "माणसाला शोभणारे सर्वात अधिक काय? कोणाची लाज घेऊ न पाहाणे हा माणसाला शोभणारा सर्वात अधिक मोठा गुण होय."

खरा सामर्थ्यवान सामर्थ्यहीनाना नेहमीच मदत करतो. पण दयेपोटी नव्हे तर मदत करण्याइतके सामर्थ्य त्याच्यापाशी असल्याने त्या सामर्थ्याच्या वजनापायी. स्वतःच्या आनंदासाठी. जे कोणी दयेपोटी एखादी गोष्ट करतात ते दया दाखविणाराला स्वतःच्या मोठेपणाने लाजवू पाहातात.

जीवन हे निसर्गतःच कठीण आहे. संघर्ष, अखंड संघर्ष हा तेथला निसर्गसिद्ध कायदा आहे. म्हणून भावविवशतेला तेथे जागा नाही. नित्शेंच्या मते माणसे स्वतःच्या दुःखाचा उगाचच बाऊ करीत असतात. मनुष्याने दुसऱ्याच्या दुःखाची कदर करावी. पण स्वतःच्या दुःखाचा बाऊ करू नये. स्वतःच्या दुःखाच्या बाबतीत प्रत्येक मनुष्याने अत्यंत कठोर असले पाहिजे. जे जे कुणी वरच्या दर्जाचे (जातीने, धर्माने वा श्रीमंतीने वगैरे नव्हे तर जीवनविषयक धारणेने) असतील त्यानी तरी स्वतःला अत्यंत कठोरतेने वागविले पाहिजे. स्वतःला सैल सोडता कामा नये. संघर्षावाचून व्यक्तीच्या व्यक्तीमत्वाला तेज चढत नाही. "माझे स्वतःचे दुःख आणि माझ्या भाईबंदांचे दुःख! शेवटी सगळ्या दुःखाची एकूण खरी किंमत काय?

नित्शे पॉवरच्या संदर्भात मूल्यांची कसोटी ठरवितात. मात्र तसे करताना व्यक्ती वा समष्टी कोणाच्याच दडपशाहीचा ते पुरस्कार करीत नाहीत. पॉवरचे समर्थन करताना त्याना फक्त एवढेच दाखवून द्यायचे असते की संघर्ष हा सर्व प्रकारच्या जीवनाचा अविभाज्य भाग असल्याने जे संघर्षाला होय म्हणतात ते तितक्या प्रमाणात अधिक सामर्थ्यवान बनतात. उलट जे नाही म्हणतात ते तितक्या प्रमाणात कमकुवत बनतात. हा संघर्ष अर्थातच दोन व्यक्तींतला किंवा वर्गातला संघर्ष नाही. नित्शेना आत्मसंघर्ष अभिप्रेत आहे. त्याना तपस्व्याचे उदाहरण भूल घालते. तपस्वी आपल्या सगळ्या शक्ती स्वतःला वळण लावण्यासाठी खर्च करू पाहातो. मात्र तपस्वी त्याना मानवी आदर्शासाठी अनुकरणीय उदाहरण वाटत नाही. कारण तपस्व्याचा सगळा भर स्वतःच्या व्यक्तीमत्वातल्या

काही प्रवृत्ती खर्ची करण्यावर आहे. संन्याशाचे किंवा तपस्व्याचे उदाहरण त्याना एवढ्यासाठी आकर्षक वाटते की संन्याशी स्वतःचे आयुष्य केवळ शारिरीक सुखां-साठी खर्च करण्याऐवजी, शारिरीक स्वास्थ्याऐवजी 'काही तरी अधिक संपादन करण्यासाठी स्वत:चे तो आयुष्य वेचू पाहातो. नित्शेंच्या भाषेत स्वत:ला मागे टाकून स्वत:च्या पलिकडे जाण्याचा प्रयत्न करतो. आणि हे करीत असताना कसल्याही प्रकारच्या शारिरीक व मानसिक कष्टांची तमा बाळगत नाही. सामान्य मनुष्ये जेव्हा दुसऱ्याच्या हक्काचेही हिरावून घेऊन स्वतःची धन करण्यात मग्न असतात तेव्हा संन्याशी खाण्यापिण्यासारख्या आवश्यक सुखासमाधानानाही नाकारून स्वत:च्या ध्येयात रममाण राहातो. विल्–टू-पॉवरचे–पॉवरचे अधिक पॉवर मिळविण्यासाठी चाललेल्या प्रयत्नांचे हे उदाहरण नित्शेना मनोवेधक वाटते. कारण या उदाहरणात आव्हान आहे–मनुष्याने स्वत:च स्वत:ला दिलेले आव्हान; स्वत:च्या माणूसपणात भर घालण्यासाठी दिलेले आव्हान.

पॉवरशी येणारा संबंध आपण टाळू शकत नाही. कारण ही संपूर्ण सृष्टीच पॉवरची बनली आहे; पॉवरपासून बनली आहे. पॉवर हे सृष्टीधारणेचे मूलद्रव्य आहे. याच पॉवरच्या तत्वाच्या आधारे स्वतःचे नैतिकशास्त्र नित्शे मांडतात व पॉवरच्या मूलभूत प्रमाणावर आणि त्या पॉवरला दिल्या जाणाऱ्या वळणावर मनुष्याचे श्रेष्ठत्व–कनिष्ठत्व जोखतात. संन्याशाच्या–ख्रिस्ती धर्मातल्या suffering God, दु:खार्त देवाच्या ठिकाणी ही पॉवर जास्तीत जास्त प्रमाणात आढळते म्हणून त्याना संन्याशाचा मानवी नमुना मनोवेधक वाटतो. मात्र दुसऱ्या एका दृष्टीने हा नमुना त्याना त्याज्यही वाटतो. कारण या नमुन्यात भौतिकाला, ऐहिकाला, थोडक्यात देहाला नकार आहे. संन्याशाचा सगळा भर शरीर व मन मारण्यावर असल्याने व हे शरीर व मन मारण्याचे काम तो न पाहिलेल्या व न पाहाता येणाऱ्या स्वर्गासाठी व परमेश्वरासाठी करीत असल्याने या प्रकारच्या आदर्शावर त्यांचा रोष आहे. या मन मारण्यात किंवा स्वत:च्या व्यक्तित्वाचे खच्चीकरण करण्यात मनुष्य अधिक उत्तम बनण्याऐवजी शरीराने व मनाने आजारी मात्र बनतो असे नित्शेना वाटते.

संन्याशाची स्वत:च्या व्यक्तित्वासंबंधिची मूलभूत विचारसरणी अशी असते की आपण पापी, दुष्ट व पतित आहोत. तेव्हा स्वत:चा उद्धार जर आपणास करून घ्यायचा असेल तर शरीराचा जास्तीत जास्त छळ केला पाहिजे. कारण शरीर हे पाप आहे. नित्शे म्हणतात की शरीर आणि मन मिळून प्रत्येक व्यक्तित्व तयार होते. शरीर व मनाचे द्वंद्व कायम टिकणारे आहे व ते टिकवून धरल्यानेच सामर्थ्य वाढणार आहे. अंतर्विरोध खर्ची न करता ते पोसले आणि मोठ्या निग्रहाने त्यांच्यावर स्वार झाले तरच सामर्थ्य वाढते अशी नित्शेंची भूमिका आहे. संन्याशाचा भर खच्चीकरणावर, म्हणजे संघर्षाच मुळच नष्ट करण्यावर

असल्याने अत्युच्च प्रकारचा इंद्रियनिग्रह त्याने साध्य केला म्हणून एका बाजूने सामर्थ्य वाढल्याचे जरी संन्याशाच्या बाबतीत दिसले तरी एकतर ते सामर्थ्य निरुपयोगी असते व दुसरे म्हणजे एकूण व्यक्तित्व खुरटे बनवून ते पैदा केलेले असल्याने त्याज्यही असते.

आत्मसंयमन व शिस्त या गोष्टी पॉवर वाढविण्यासाठी अत्यंत आवश्यक आहेत ही गोष्ट खरी. परंतु शिस्तीचा रोख कोठल्याही नैसर्गिक प्रवृत्तीच्या खच्चीकरणाकडे, निर्मूलनाकडे असू नये असे नित्शेना वाटते. माणूस म्हणजेच त्याच्या प्रवृत्ती किंवा अधिक बरोबर म्हणजे त्याच्या प्रवृत्तींची अभिव्यक्ती असल्याने प्रवृत्तींचे निर्मूलन शक्य नसते. प्रवृत्तींचे निर्मूलन म्हणजे त्या व्यक्तीचेच निर्मूलन होय. तेव्हा खच्चीकरण नव्हे तर वळण हा मानवी जीवनाचा आदीमंत्र हवा असे नित्शे म्हणतात. प्रत्येक व्यक्तीच मुळात विल–टू–पॉवरचा आविष्कार आहे आणि विल–टू–पॉवर हे शक्तितत्व आणि आकारतत्व या दोन संघर्षतत्वांच्या समन्वयातून बनले असल्याने काही केले तरी संघर्ष टाकून देता येणार नसतो. तेव्हा हा संघर्ष टिकवून स्वतःला वळण लावणे किंवा वरच्या दिशेला नेणे म्हणजे सामर्थ्य वृद्धिंगत करणे होय. अनेकदा असे दिसते की माणसाच्या आंत असणारा हा संघर्ष तेथेच टिकवून धरण्याऐवजी व त्या संघर्षातून पॉवरवर ताबा आणण्याऐवजी अनेक मनुष्ये ती पॉवर बाहेरच्या मनुष्यांविरुद्ध वा घटनांविरुद्ध वापरू पाहातात. अर्थात यात ते थोडेफार भौतिक यश व ऐहिक सुख संपादन करतात ही गोष्ट खरी असली तरी माणूस म्हणून आधी ते ज्या ठिकाणी असतात त्याच्या पलिकडे काही ते जाऊ शकत नाहीत. कारण माणूस हा माणसाने स्वतःच मागे काढण्याची गोष्ट आहे. अतिमानवाचे तत्त्वज्ञान म्हणजे हे कसे करता येईल याचेच विवरण होय.

अतिमानवाच्या तत्त्वज्ञानात स्वतःच स्वतःला शिस्त लावून घेण्याची, व्यक्तित्वाला वळण देण्याची कल्पना मध्यवर्ती आहे. अशा प्रकारच्या कठोर शिस्तीवाचून जगात श्रेष्ठ असे काहीही निर्माण होऊ शकत नाही याबद्दल नित्शेंची वालंबाल खात्री आहे. खुद्द विल–टू–पॉवर हा केवळ एक फोर्स आहे. नैतिक शास्त्रे म्हणजे या फोर्सची रूपांतरे. तेव्हा अनुक्रमाच्या दृष्टीने पहिला असलेला विल्–टू–पॉवरचा फोर्स सर्व प्रकारच्या नैतिक विचारसरणींच्याही आधीचा ठरतो. नैतिक विचारसरणी मांडून व त्या विचारसरणींप्रमाणे स्वतःचे आयुष्य घडविण्याचे प्रयत्न करून माणूस माणूसपणाला पोहोचला आहे. तेव्हा नीती व त्या नीतीचे कठोर पालन ही गोष्ट मनुष्याच्या मनुष्यत्वासाठी अत्यंत आवश्यक आहे, मात्र नीतीचे प्रकार अनेक असल्याने व प्रत्येक जातीजमातीच्या लोकांनी स्वतःसाठी एकएक नीतीधर्म तयार केल्याचे आपण पाहात असल्याने मनुष्याला श्रेष्ठत्व प्राप्त करून घेण्यासाठी नैतिक धर्म हवा असे जरी आपण म्हटले तरी विवक्षित नैतिक धर्मच हवा असे मात्र आपणास म्हणता येणार नाही अशी नित्शेंची भूमिका आहे. नव्या काळाला व

नव्या परिस्थितीला अनुलक्षून नव्या प्रकारचा नीतीधर्म मनुष्याने स्वतःसाठी तयार केला पाहिजे असे नित्शेचे आवाहन आहे.

मनुष्याला जर स्वतःचा उद्धार करून घ्यायचा असेल, अधिक उच्च प्रकारचे व प्रगल्भ व्यक्तिमत्व संपादन करायचे असेल तर त्यासाठी त्याला नैतिक शास्त्राचा अवलंब करावाच लागेल. कारण आज दिसते ते मनुष्याचे रूप केवळ नैतिक आचारशास्त्राच्या परिपालनातून निर्माण झाले आहे. तेव्हा मनुष्याने नैतिक आचारविचार पाळावेत की नाहीत हा वादाचा प्रश्नच नाही. प्रश्न आहे तो हे आचारविचार त्याने स्वतःबाहेरील तथाकथित अबाधित आणि वस्तुनिष्ट परमेश्वरी तत्त्वाच्या आधारे ठरवावेत की स्वतःच्याच मनुष्यत्वाच्या आधारे ठरवावेत हा होय. कारण नैतिक मार्गदर्शन बाहेरून मिळत नाही. परमेश्वरावरचा विश्वास आज डळमळीत झाला आहे. निसर्ग हे मार्गदर्शन देऊ शकत नाही. कारण निसर्ग नीतीअनीतीच्या कल्पनांच्याच पलिकडे आहे. निसर्गाला स्वतःची वैयक्तिक विचार-शक्ती नसल्याने बरेवाईट ठरविता येण्याची क्षमताच निसर्गापाशी नाही. म्हणजे अशा प्रकारच्या कल्पनांच्या बाबतीत निसर्ग पूर्णतया निर्विकार व तटस्थ आहे. पोटक्याने नीती मानवरचित व सापेक्ष आहे. म्हणून आदर्श मनुष्याची कल्पना जर आपण बदलली तर त्याचे नैतिक शास्त्रही आपण बदलले पाहिजे असे नित्शे म्हणतात. तसेच माणूस हा इतिहासगत प्राणी असल्याने त्याची आदर्श मनुष्याची कल्पना बदलणे अपरिहार्य आहे व ती कल्पना बदलणे अपरिहार्य असल्याने त्याचे नैतिकशास्त्रही बदलणे अपरिहार्य आहे. किमानपक्षी ज्या बौद्धिक वा भावनिक कारणांसाठी आपण आजची आपली नीती खरी म्हणजे वस्तुस्थितीनिदर्शक (फॅक्ट म्हणून) मानतो ती कारणमीमांसा, आपल्या नैतिक विचारसरणीमागचे अबोध बौद्धिक धर्मशास्त्र (मेटॅफिजिक्स) तरी बदलले जाणे आवश्यक आहे असे नित्शे मानतात. कारण जोवर हे जुने अबोध धर्मशास्त्र आम्ही बदलीत नाही तोवर जुन्याच दृष्टीतून स्वतःकडे व स्वतःच्या जगाकडे आणि शेवटी स्वतःच्या अंतिम भागधेयाकडे, जीवनाच्या परिपूर्तीकडे आपण पाहाणार आहोत.

नित्शे स्वत: नैतिक प्रश्नाच्या अगदी मुळाशी जातात आणि नैतिक आचार-शास्त्रेच नव्हेत तर ही नैतिक आचारशास्त्रे ज्याच्यामुळे वस्तुस्थितीसारखी भासतात त्या नैतिक आचारशास्त्रांमागच्या सराईत व अबोध बौद्धिक बैठकींतही शिरतात व या बैठकींची तपासणी करून नवीन काळासाठी नवीन मानवी आदर्शाची–अति-मानवाच्या आदर्शाची मूल्ये सूचित करतात. अतिमानवाची कल्पना अतिशय लवचिक आहे. कोठेही नित्शे अतिमानव कसा असेल त्याची ठाम लक्षणे देत नाहीत. फक्त एक अस्पष्ट असा आराखडा मात्र ते देतात. हे अर्थात युक्त असेच होते. कारण अतिमानव ही सर्वकालिक कल्पना आहे. परमेश्वराच्या कल्पनेसारखी नेमकी लक्षणे दिल्याने ती रिजिड बनली असती. व मग फक्त कोठल्यातरी निश्चित काळापुरतीच

उपयोगी पडली असती. मात्र ज्या दोन मूलभूत कल्पनांच्या आधारे ही कल्पना उभी आहे त्या कल्पनांचा निर्देश ते स्पष्ट शब्दात करतात. मनुष्य विल्-टू-पॉवरचा बनला आहे. विल्–टू–पॉवर द्वयर्थी आहे. ते शक्तीतत्व आहे तसेच आकारतत्व आहे. स्थितीतत्व आहे. तसेच गतीतत्व आहे. मनुष्याच्या बाबतीत आपण आणखी असे म्हणू शकतो की मनुष्याला शरीर आहे आणि मनही आहे. सारांश, माणसाचे कोठलेही भागधेय या विशिष्ट चौकटीच्या आतच फक्त सिद्ध होणारे असेल. मनुष्य हा विल्-टू–पॉवरचा बनला आहे. किंवा तो म्हणजे विल्–टू–पॉवरच आहे. विल्–टू–पॉवर म्हणजे अर्थात शक्तीप्रेरणा आणि आकारप्रेरणा या दोन प्रेरणांचे मिश्रण. अतिमानवसुद्धा याच मिश्रणाचा बनलेला असतो आणि त्याच दोन शक्तींचा वापर करून तो मनुष्यत्वाच्या पलिकडचे अतिमनुष्यत्व आत्मसात करणार असतो.

अतिमानवामध्ये मूलतःच विल्चे प्रमाण सर्वसामान्यांच्यातल्या प्रमाणापेक्षा अधिक असते. याचाच अर्थ जीवन प्रगल्भ बनविण्यासाठी आवश्यक तो कच्चा माल-मसाला त्याच्यापाशी आधीच असतो. म्हणजेच प्रगल्भ बनता येण्याची शक्यताही त्याच्या बाबतीत अधिक प्रमाणात असते. विल्–टू–पॉवरची प्रकृतीच अंतर्विरोधाची असल्याने तेच अंतर्विरोध मनुष्याच्याही ठिकाणी परावर्तित झालेले असतात. तसेच विल्–टू–पॉवर स्वतः सर्वांत आधी असल्याने सर्व प्रकारच्या इष्टानिष्टसूचक नैतिक द्वंद्वानाही ते आधीचे असते. म्हणजेच कोठल्याही प्रकारे विकसित होऊ शकण्याची क्षमता त्याच्या ठिकाणी मूलतः हजर असते. कारण विशिष्ट नैतिक आचारधर्म म्हणजे विल्चे त्या प्रकारचे रूपांतर–तसला विकास असतो.

विल्–टू–पॉवरमध्ये मूलभूत आंतर्विरोध, स्थिती–गती, शक्ती-आकार वगैरे आहेत, शिवाय नैतिक यमनियम तयार करून व ते नियम स्वतःवर लादून घेण्याचा प्रयत्न करून मनुष्य याच आंतर्विरोधात स्वतः तयार केलेल्या आंतर्विरोधाची भर घालतो. व तसे करून स्वतःच्या व्यक्तित्वाला आदर्श वळण देण्याच्या संधीही तयार करतो. नित्शेच्या मते उच्च प्रकारचे व्यक्तित्व विकसित करण्यासाठी हे आंतर्विरोध टिकवून धरणे, त्यांच्यात नाजूक असे संतुलन प्रस्थापित करणे आवश्यक आहे. ख्रिस्ती धर्मातील संन्याशाच्या आदर्शात हा आंतर्विरोध खच्ची करू पाहातात. म्हणजे असे की चांगल्याच्या तुलनेत वाईट, न्यायाच्या तुलनेत अन्याय वगैरे नष्ट करू पाहातात. वस्तुतः चांगले–वाईट, न्याय–अन्याय या सगळ्या मानवरचित व सापेक्ष कल्पना आहेत. ती नैसर्गिक वस्तुस्थिती नाही. तेव्हा आजचे वाईट उद्याचे चांगले ठरू शकते किंवा आजचे चांगले उद्याचे वाईटही ठरू शकते. अशा परिस्थितीत विशिष्ट प्रवृत्ती नष्ट करून टाकणे किंवा ती प्रवृत्ती रोगट बनविणे म्हणजे उद्या कदाचित जी नवी परिस्थिती निर्माण होईल त्या परिस्थितीसाठी स्वतःला आजच अकार्यक्षम बनवून ठेवण्यासारखे आहे.

विल्-टू-पॉवरला स्वतःला चांगले-वाईट कळत नाही. हे सगळे माणसाने तयार केलेले भेद आहेत. विल् या सर्व भेदांच्या पलिकडून सुरू होते. तसेच विल् ही ऊर्जा असल्याने ती तशी नष्ट होऊ शकत नाही, मनुष्य जेव्हा तिला नष्ट करू पाहातो तेव्हा तिला केवळ कोंडून ठेवण्यात तेवढा तो यशस्वी होतो. अशा प्रकारे जेव्हा तो ती शक्ती कोंडून ठेवतो तेव्हा जी शक्ती आपण कोंडून ठेवली आहे, तिचा उद्रेक कधीही घडू शकतो याविषयीच तो अज्ञ असतो. शिवाय शक्ती कोंडून ठेवल्याने ती नको त्या मार्गाने बाहेर येऊ पाहाते हा एक वेगळा धोका निर्माण होतो तो होतोच. सारांश, या खटाटोपात मनुष्य स्वतःच स्वतःला इजा पोचवतो. प्रेरणा दडपल्याने नैतिकदृष्ट्या अधिक शुद्ध बनण्याऐवजी मनुष्य शारिरीक व मानसिकदृष्ट्या अधिक आजारी मात्र बनतो.

नित्शेची अतिमानवाची कल्पना शारिरीक व मानसिक निरोगीपणाच्या कल्पनेवर आधारित आहे. म्हणून ते म्हणतात की कोठल्याही प्रेरणा बळेच दडपून टाकण्याचा प्रयत्न न करता त्याना चुचकारून अधिक वरच्या प्रकारच्या कार्याला जुंपता आले पाहिजे. तेव्हा प्रेरणांचा द्वेष-आत्मद्वेष नव्हे तर प्रेरणांबद्दल योग्य ती कदर-आत्मप्रेम हीच मनुष्याच्या आयुष्याच्या बाबतीत महत्त्वाची गोष्ट आहे. म्हणून आत्मनिरोध नव्हे तर आत्मशिस्तीला मानवी जीवनात महत्त्वाचे स्थान दिले गेले पाहिजे. चांगल्यावाईटाच्या कल्पना मूलतःच संदिग्ध आहेत. ज्याला आम्ही चांगले म्हणतो त्याला आमचा शेजारी देश वाईट म्हणतो. म्हणून आपली तयारी दोघांसाठीही हवी. पण चांगल्यासाठी वाईटाला ठार केल्यास वाईटाच्या गरजेच्या वेळी आपण कमजोर ठरू. अतिमानवाला सर्वच गोष्टींचा उपयोग आहे. एका अर्थी चांगले-वाईट आदी सर्व प्रकारच्या द्वंद्वांच्या पलिकडेच तो राहातो. सर्व प्रकारच्या नैतिक आचारशास्त्रांच्या पाठीमागील अबोध वैचारिक धर्मशास्त्र त्याने समजून घेतले असल्याने स्वतःची मूल्ये त्याने स्वतःच बनविलेली असतात. गरजेपोटी तो चांगले करत नाही तर चांगले हीच त्यांची गरज असते. नीती तो नको म्हणत नाही तर स्वेच्छेने-इतर कुणाच्या दडपणासाठी; परमेश्वराच्या, हुकूमशहाच्या, धर्माच्या, समाजाच्या नव्हे-तो नीती पाळीत असतो. इतरांचा नैतिक धर्म आणि अतिमानवाचा नैतिक धर्म यात फरक इतकाच की चांगल्याच्या प्रेमासाठी तो चांगले मानतो. तर इतर सर्वसामान्य लोक कोणाच्या भीतीसाठी किंवा पुढे मिळणाऱ्या लाभाच्या आमिषासाठी चांगले वागतात-अतिमानवाच्या नीतीचा आधार तो स्वतः असतो. इतरांच्या नीतीचा आधार कोणी अन्य असतो.

कोठल्याही बौद्धिक प्रश्नाच्या अगदी मुळाशी जाऊन त्या प्रश्नाचा शोध घेण्याची नित्शेची सवय नीतीच्या-मॉरॅलिटीच्या प्रश्नाच्या बाबतीतही दिसून येते. दोन वेगवेगळ्या बाजूंनी ते नीतीच्या प्रश्नाचा विचार करताना एकीकडे ते

नैतिक विचारसरणींचे विश्लेषण करून त्यांची युक्तायुक्तता जोखू पाहातात. तर त्याच वेळी दुसरीकडे नव्या प्रकारची नीती ते सूचित करू पहातात. त्यानी धारण केलेल्या या परस्परविरोधी भूमिका स्वतंत्र ठेवूनच त्यांच्या नीतीवाचक विचारांचा परामर्ष घ्यावयास हवा. हे अर्थात थोडे कठीण आहे. कारण ते कधी प्रचलित नीतीच्या तर्कशुद्धतेवर हल्ला करतात. तर कधी प्रचलित नीतीशास्त्र बदलू पाहातात आणि बऱ्याचदा या दोन्ही गोष्टी ते एकाच परिच्छेदात करताना आढळतात.

नित्शेच्या दृष्टीने नीती हासुद्धा इतर बौद्धिक प्रश्नासारखाच एक बौद्धिक प्रश्न होता. म्हणजे काळजीपूर्वक चिकित्सक वृद्धीने तपासणी करण्याचा प्रश्न. सामाजिक प्रश्नांची चिकित्सापूर्वक तपासणी आपण करतो. राजकीय, शास्त्रीय, इतर अगणित प्रकारच्या प्रश्नांची चिकित्सक तपासणी आपण करतो. याला अपवाद नैतिक मूल्यांचा किंवा नीतीचा. नीतीच्या प्रश्नांची चिकित्सक तपासणी आपण करीत नाही. आपल्या दृष्टीने नैतिक तत्वे ही वस्तुस्थितीनिदर्शक घटितांसारखी ( फॅक्ट्स् ) असल्याने त्यांच्याविषयी संशय अशक्य आहे. समोरच्या खुर्चीच्या खरेपणाबद्दल मी शंका घेत नाही. कारण तिचे प्रत्यक्ष अस्तित्व मला जाणवत आहे. नैतिक तत्वेसुद्धा आपण तशीच स्वयंसिद्ध समजत असतो. आपल्या समाजातील प्रचलित नीती ही जणू काही एक स्वयंसिद्ध वस्तुस्थिती आहे असे गृहित धरून नीतीविषयक आपले सगळे व्यवहार चालतात.

नित्शे याच प्रकाराची शंका घेतात. ते म्हणतात की नैतिक तत्वे ही प्रत्यक्ष घटितांसारखी घटिते ( फॅक्ट्स् ) नसून ती मते आहेत. आपण स्वतःच्या मनाशी करून घेतलेले ग्रह आहेत किंवा परिस्थितीचे आपण केलेले ते अन्वेषण आहे. म्हणजेच ती अस्थिर व बदलती आहेत. ती अबाधित नाहीत. पण मग आपणाला मात्र ती घटिते आहेत, त्रिकालाबाधित वस्तुस्थितीनिदर्शक सत्ये आहेत असे का बरे वाटते ? नित्शे म्हणतात की त्याचे कारण असे आहे की ज्या अमूर्त अशा मानसिक धारणांवर ही मते आधारित असतात व ज्या धारणांमुळे ती आपणाला प्रत्यक्ष वस्तुस्थितीप्रमाणे वाटतात त्या धारणांपर्यंत आपण कधी पोहोचतच नाही. या धारणा आपण कशासाठी खऱ्या मानतो याचा विचारच कधी आपल्या डोक्यात येत नाही. काही कारणाने त्या धारणाना आपण खरे व संशयातीत धरून चाललेलो असतो व त्यांचा आधार आहे म्हणून त्यातून निष्पन्न होतात म्हणून नैतिक तत्वेही तशीच खरी आहेत असे मानून आपण चालतो.

तुम्हाला वाटते की 'अ' हे सत्य आहे. मी विचारतो की कशावरून ? तुम्ही म्हणता की 'अ' हे 'ब' वर आधारित आहे. मी विचारतो की 'ब' च्या खरेपणाचा पुरावा काय ? तुम्ही म्हणता की 'ब' 'फ'वर आधारित आहे. असे करत करत आपण एखाद्या च या मूळ धारणेशी ( ॲटिट्यूड ) येऊन पोचतो.

तुमच्या दृष्टीने ही धारणा इतकी स्वयंसिद्ध असते की तिच्या खरेपणाची शंका घेण्याचे कारणच तुम्हाला पडत नाही. नव्हे 'च' या त्या धारणेच्या खरेपणाची शंका घेण्याचा विचारही कधी तुमच्या मनात येत नाही. इतकी तुमची ती धारणा तुम्हाला खरी वाटत असते.

निल्सो म्हणतात की आपणा प्रत्येकाच्या मनात हे जे मानसिक कल ( ॲटिट्यूड्स्, धारणा ) ठाण मांडून आहेत व योग्य तो पुरावा नसतानाही ज्याना आपण शंभर टक्के खरे धरून चाललेलो असतो त्यांची तपासणी व्हांवयास हवी. आपली नैतिक तत्वे ही खरे तर मते, ग्रह आणि आग्रह आहेत. पण त्यांच्या मागची मानसिक चौकट आपण स्वयंसिद्धरित्या खरी धरून चालल्याने त्यानाही आपण वस्तुस्थिती मानू लागलो आहोत.

आपणा प्रत्येकाच्याच मनात खाली कोठेतरी या प्रकारचे काही थोडे तथाकथित, स्वयंसिद्ध मध्यवर्ती मानसिक कल घर करून आहेत. आपली सगळी नैतिक वा राजकीय मते जर आपण तपासून पाहिली तर शेवटी आपल्या डोक्यातल्या या चारदोन मध्यवर्ती मानसिक कलांपर्यंत आपण येऊन पोहोचू.

'अ'...... 'ब'...... 'क'...... (च)

वरील उदाहरणात **अ** हे सत्य आहे हे प्रतिपादन आपण केले त्याऐवजी 'अ' हे इष्ट आहे असे नीतिवाचक प्रतिपादन आपण करू शकतो. येथे ( **च** ) हे अंतिम, अबाधित मूल्य असेल व बाकीची सगळी नैतिक तत्वे या अंतिम मूल्याने दिलेल्या मर्यादेत फिरत असतील. हे अंतिम मूल्य आपणाला सूर्यप्रकाशाइतके सत्य वाटत असल्याने त्याच्यावर आधारीत बाकीची सर्व नैतिक तत्वेही आपणास निर्णायक खरी वाटत असतील. (च) ला आपण भुमितीतल्या अक्षरेषेची उपमा देऊ शकतो. (च) ही अक्षरेषा मानल्यास **अ** व **ब** हे चलबिंदू (च) च्या अक्षरेषेला धरून वावरतील. काही झाले तरी **अ** व **ब** (च)च्या बाहेर जाऊ शकणार नाहीत. किंवा (च) ला आपण **अ** व **ब** ज्या चौकटीवर बेतलेले असतील त्या मूलभूत चौकटीची उपमा देऊ शकतो. (च) ला जर आपण अशी चौकट मानले तर **अ** व **ब** त्या चौकटीवरचे फक्त बिंदू असतील. आणि फक्त तेवढेच आपण पाहात असू. कारण आपण त्या चौकटीतच वावरत असल्याने ती चौकट काय आहे हे आपल्या सहसा ध्यानातच येणार नाही. आपण ती चौकट गृहित धरलेली असेल. चौकटीची माहिती होण्यासाठी आपणाला त्या चौकटीच्या बाहेर यावे लागेल. सहसा आपणाला अशा प्रकारे बाहेर येण्याची गरजच पडत नाही. असो.

आपली सगळी "**नव्हे**" अशा प्रकारच्या कसल्या ना कसल्या **अबोध** **चौकटीवर** आधारित असतात. ही चौकट काय आहे, किंवा ती कोठून आली असावी त्या प्रश्नात आपण सहसा शिरत नाही. आपणाला आपली ढोबळ

" तत्वे " ( मते ) तेवढी अवगत असतात. पण ज्या ( च ) चौकटीतून ही " तत्वे " आपण घेतलेली असतात त्या चौकटीची काहीच जाणीव आपणाला असत नाही. गंमत अशी की अ आणि ब ही आपली मते समजा, आपण जाणीव-पूर्वक जर तयार केली असली तरी (च) ची चौकट मात्र आपण स्वतःच्या नकळत, अगदी बेसावधपणे आत्मसात केलेली असते. ही चौकट आपणाला कशी मिळते ? आपली मते आपण स्वत:च्या प्रयत्नाने बनवतो असे जर आपण म्हटले तर ही चौकट आपण तयारच्या तयार उचलतो असे म्हणता येईल. ही चौकट काही झाले तरी आपण बनविलेली नसते. ती आपण आपापल्या समाजांकडून तयार स्वरूपात घेतलेली असते. या चौकटी आपल्या मनाच्या अविभाज्य भाग असतात. पण आपल्या मनाला असा काही भाग आहे याची जाणीव मात्र आपणाला असत नाही. याचे कारण असे की अ आणि ब ही जी तपशिलवार मते समाजाने जवळपास आपल्या डोक्यावर लादलेली असतात त्या मतातच या चौकटी प्रच्छन्नपणे घर करून असतात. त्यामुळे त्या मतांबरोबरच या चौकटीही आपण आत्मसात करीत असतो. पण मते स्पष्ट दिसतात. या चौकटी स्पष्ट दिसत नाही. पण मते या चौकटींचाच तार्किक भाग असतात. या चौकटी म्हणजे ज्याच्या त्याच्या सामाजिक वातावरणाचाच भाग असल्याने हे वातावरण जेव्हा आपण आत ओढून घेतो तेव्हाच आपण या चौकटीही आत ओढून घेतो असे आपण म्हणू शकतो. आमच्या नकळत आमच्यावर अशा प्रकारे अनुभवपूर्व तत्वांचा ( कॅटेगरीज् ) एक आख्खाच्या आख्खा सरंजाम समाजाकडून लादण्यात आलेला असतो आणि आमचे सगळे विचार आम्ही या वैचारिक सरंजामाच्या आत राहून करायचे असते. (च) ही अशा प्रकारे आमच्या विचार करण्याची एक मूलभूत धाटणी ( कॅटेगरी ) बनल्याने काय घडते ते पाहा. (च) ही धाटणी असल्याने तिचे खरेपण आपण गृहितच धरलेले असते. परंतु ' अ ' हा जरी केवळ ग्रह असला तरी त्या ग्रहाला (च)चा पाठिंबा लाभल्याने तो केवळ ग्रह आहे, ती वस्तुस्थिती नाही हे आपल्या कधीच ध्यानात येत नाही. ( च ) खरा म्हणून ( च )च्या आधाराने बनलेला ' अ ' हा ग्रहदेखिल खरा असला पाहिजे असे आपण मानत जातो. जणू काही ( च ) वस्तुस्थिती आहे म्हणून ' अ ' वस्तुस्थिती आहे. ( च ) आपण कधीच पाहात नाही. उलट बाहेरच्या जगात किंवा स्वतःच्या आयुष्यासंबंधिही जे जे आम्ही पाहातो ते ते आम्ही ( च )च्या मध्यस्थीने पाहातो.

या अनुभवपूर्व वैचारीक धाटण्या अशा प्रकारे आपली सगळी विचारप्रक्रिया मर्यादाबद्ध करतात: काही विशिष्ट मर्यादातच आमच्या विचाराना फिरावयास लावतात. अर्थात यातील काही धाटण्याना सयुक्तिक म्हणता येईल. उदा. पैस आणि काळाच्या वैचारीक धाटण्या जर आपण वापरल्या नाहीत तर आपणाला







जगाचा काही अर्थच लावता येणार नाही. म्हणजेच या धारणा वस्तुनिष्ट आहेत. त्याना असण्याचा अधिकार आहे. परंतु इतर अशा अनेक धारणा आहेत की असण्याचा ज्याना स्वतःचा अधिकार नाही. त्या केवळ आमच्या त्यांच्यावरच्या विश्वासाने अस्तित्वात असतात. या खोट्या किंवा भ्रामक धारणा होत. परंतु याचा अर्थ या धारणा कमी महत्वाच्या आहेत असा नाही. दोन कालखंडातल्या लोकांच्या बौद्धिक दृष्टीकोनातला फरक हा शेवटी या प्रकारच्या भ्रामक धारणा-मधल्या फरकावर अवलंबून असतो.

समजा, कर्मविपाकाच्या तत्वज्ञानावर तुमचा ठाम विश्वास आहे. हा विश्वास असताना ज्या प्रकारे तुम्ही जगाचा व स्वतःच्या आयुष्याचा अर्थ लावाल त्याच्या-पेक्षा अगदी वेगळा अर्थ हे तत्वज्ञान तुम्ही मानीत नसला तर लावाल. धार्मिक दृष्टीकोन माणसाला पापी आणि पतित मानतात. साहजिकच माणसाच्या तुलनेत ते कोणा पवित्र प्राण्याची कल्पना रचतात. मानवतावादी मनुष्याला पापी वगैरे न मानता मुष्ट मानतात. फक्त त्यांच्या दृष्टीने परिस्थितीमुळे मनुष्य वाईट बनतो. तेव्हा सांगायची गोष्ट ही की या ज्या अमूर्त वैचारीक धारणा जन्मल्यापासून आपण आपल्या डोक्यात साठवून ठेवतो त्या धारणांमुळे वस्तुस्थिती पाहाण्याची आपली नजरच संपूर्णपणे बदलून जाते. त्यांच्यावर विसंबून केवळ बौद्धिक मतानाही आपण मग फॅक्टस समजू लागतो. असो.

नित्शेचा सर्व रोष या प्रकारच्या अमूर्त मानसिक धारणांवर आहे की ज्यांच्यामुळे आपण काय जगत आहोत हे माणसाच्या ध्यानात येईनासे होते. नित्शे म्हणतात की फक्त नैतिक तत्वांचीच तपासणी करून आपण थांबता कामा नये. आपण या नैतिक तत्वांच्या पाठीमागे त्याना आधार देणारी जी अबोध भावनिक वा वैचारीक बैठक असते तीही तपासून पाहिली पाहिजे. नित्शे स्वतःला Immoralist म्हणवून घेतात. म्हणजे अर्थात अनीतीवादी वा अनीतीमान नव्हे. तर प्रस्थापित नीतीवर जो विश्वास ठेवीत नाही, नीती हाच ज्याला बौद्धिक प्रश्न वाटतो असा मनुष्य होय. नित्शे नीतीशास्त्रांची तपासणी करीत असले तरी कोठल्याही विशिष्ट नीतीशास्त्राची बाजू ते घेत नाहीत.

जगात आज अनेक नीतीशास्त्रे प्रचालित आहेत. पण खुद्द जग मात्र या प्रकारच्या नैतिक-अनैतिक कल्पनांच्या बाबतीत पूर्णतया निर्विकार आहे. जगाला आमची नीती कळत नाही आणि अनीतीही कळत नाही. सुष्टपणा कळत नाही आणि दुष्टपणाही कळत नाही. खरेपणा कळत नाही आणि खोटेपणा कळत नाही. या सगळ्या माणसाने तयार केलेल्या कल्पना आहेत. सगळी नीतीशास्त्रे काही ना काही धारणांवर तयार केली गेली आहेत. ती आधीपासून कोठे होती व प्रत्येक समाजाला ती शोधून सापडली, अथवा कोठल्या परमेश्वराने वा परमेश्वराच्या प्रेषिताने ती त्या त्या समाजाला ती दिली नाहीत. प्रत्येक समाज तिच्या गरजेप्रमाणे

स्वत.चे इष्ट–निष्ट ठरविते. आणि जीवनाच्या वाटचालीत मदत हाच या नीती-शास्त्रांचा एकमेव उद्देश आहे.

नित्शेंच्या दृष्टीने सर्व प्रकारच्या नीतीमूल्यांच्या बाबतीत एकमेव महत्वाचा प्रश्न म्हणजे " मूल्याचे मूल्य काय ? " हा होय. हे मूल्य, मूल्य म्हणून आपण का मानतो ? हे मूल्य टाकून देऊन त्या ऐवजी दुसरे आपण का स्वीकारू नये " ?

नीती म्हणजे सामाजिक रुढी. या रुढी प्रथम काही सामाजिक कारणासाठी, काही उपयोगासाठी तयार झालेल्या असतात. आणि दीर्घ कालावधिनंतर त्यांना रूढीचे स्वरूप आलेले असते. जेथे अशा रुढी नसतात तेथे सामुदायिक नीतीधर्महो असू शकत नाही. कारण सर्वजण सामुदायिकरित्या पाळतील अशी सामाजिक बंधनेच तेथे नसतात. अशी बंधने तेथे नसल्याने तेथील लोक एकमताने वागत नाहीत. अर्थात काही रुढी निरर्थक मूर्खपणाच्याही असू शकतील. परंतु रुढीला रुढी म्हणूनही अर्थ आहे. रुढी म्हणजे सर्वांनी विनाअपवाद पाळण्याचे नियम. अशा नियमातूनच समाज तयार होतात. तेव्हा रुढीमुळे तेथल्या लोकांचा ऐहिक फायदा होईल अथवा होणार नाही. पण **रुढी तेथे आहेत हाच त्या रुढींचा सर्वात मोठा फायदा** असतो. रुढी तेथील लोकांना **एकत्र करतात.** एका अर्थाने सामाजिक रूढी असणे म्हणजे नीतीशास्त्र असणे होय. कारण रूढी म्हणजे नियम, बंधन, आणि बंधन म्हणजे शिस्त, संयम. " अजिबात कसलाच कायदा नसण्यापेक्षा एखादा वाईट कायदाही स्तुत्य असतो. कारण कायद्यावाचून संस्कृती या शब्दाना अर्थ नाही. "

जगातल्या प्रत्येक समाजापाशी रुढी आढळतात. या रुढींचा भंग करणाराला तेथे कठोर शासन केले जाते. अनेकदा या रुढी निर्बुद्ध आणि जुलमीही असतात. परंतु तशा त्या असूनही लोक त्या पाळतात. कारण जर त्यानी तसे केले नाही तर त्याना एकत्रित राहाताच येणार नाही. म्हणजेच त्यांचा समाज बनू शकणार नाही. लोक जर एकमेकांशी जमवून घेणार असतील तरच त्यांचा समाज बनू शकेल. रुढी अशा प्रकारे जमवून घेण्यासाठी मदत करतात. आणि येथेच नीती-अनीतीच्या कल्पनांचा उगम होतो. जे रुढीशी जमवून घेतात ते नीतीने वागतात, जे जमवून घेणार नाहीत ते अनीती करतात असे समाजपुरुष म्हणतो. प्रस्थापित रुढींना आव्हान म्हणजे त्या रुढीच्या आधारे उभ्या असलेल्या समाजालाच आव्हान होय.

परंतु नीतीधर्म केवळ रुढीशी संपत नाहीत. या रुढींना स्पष्टीकरणे व समर्थने लागतात. हेच नियम का पाळावेत ? दुसरे का पाळू नयेत ? याची कारणमीमांसाही नीतीधर्मातच मोडते. ही मीमांसा मोठी अद्भुत असते. आणि तिचा प्रत्यक्ष संबंध त्या नैतिक यमनियमांशी असतोच असेही नाही. आमचा कोणी एक पूर्वज – देव, हिरो – फार फार प्राचीन काळी अशा प्रसंगी असा वागला होता. म्हणून आपणही तशा प्रसंगी तसेच वागले पाहिजे. थोडक्यात देवाधर्माशी संबंध

जोडून त्या रुढी तेथील लोकांच्या मनावर बिंबविण्यात येतात. मात्र प्रत्यक्षात देवधर्म याच गोष्टी काल्पनिक असल्याने देवाधर्माच्या 'इच्छेपेक्षा' समूहाच्या इच्छेशीच ( विल्–टू–पॉवरशीच ) त्यांचा सर्वात जवळचा संबंध असतो.

हा परमेश्वराचा, परमेश्वराच्या दूताचा वा प्रेषिताचा आवाज असे जरी प्रत्येक नीतिशास्त्र सांगत असले तरी परमेश्वराच्या आवाजाशी त्यांचा संबंध नसून त्यांचा संबंध समूहाच्या आवाजाशी आहे असे नित्शे सांगतात. वैयक्तिक घटकाच्या विल्–टू–पॉवरवर समूह स्वतःचे विल्–टू–पॉवर लादीत असतो आणि नाव मात्र परमेश्वराचे अथवा अशाच कोठल्यातरी अलौकिक तत्वाचे देत असतो. अर्थात यात व्यक्तीला अनेक बाबतीत जरी स्वतःचे मन मारावे लागले तरी स्वतःचा व इतर सर्वांचा सर्वांगीण फायदा आणि सुरक्षितता विचारात घेऊन कोणीही घटक समूहाच्या इच्छेला विरोध करीत नाही. नैतिक आचारधर्मात या प्रकारचा वैयक्तिक त्याग अनुस्यूतच असतो. याचा गर्भित अर्थ असा की सामुदायिक व समान प्रेरणांना व आशाआकांक्षाना जरी समूहात वाव असला तरी व्यक्तीच्या वैयक्तिक व समूहविरोधी प्रेरणाना व आशाआकांक्षाना तेथे वाव असू शकत नाही. म्हणजेच असाधारण आणि अलौकिकाला त्या समूहात स्थान असू शकत नाही. एकतर त्याला तेथून जावे लागेल किंवा समूहाच्या हातून नष्ट व्हावे लागेल. कारण इतर सर्वसामान्यांपेक्षा हा इसम वेगळा आहे म्हणजेच त्याच्या प्रेरणा व इच्छा वेगळया आहेत.

आपल्या दृष्टीने महत्वाचा मुद्दा हा आहे की कोठलाही नीतीधर्म हा काल्पनिक कारणमीमांसेवर आधारित असतो. समूहाचे सर्वसाधारण हित हिशेबात घेऊन तेथील लोकांचे नैतिक आचरण आखण्यात आलेले असते. समूहाच्या हिताला तेथे जपण्यात येते आणि व्यक्तीचे वैयक्तिक सुखदुःख, हिताहीत दुर्लक्षित केले जाते. अशा समाजात कोठल्याही प्रकारच्या एकांतिक वैयक्तिक प्रतिक्रियाना व प्रेरणाना वाव दिला जात नाही असेच नव्हेतर अशा प्रतिक्रियांवर व प्रेरणांवर तेथे बंधन घालण्यात येते. परिणामतः कोठलाही नीतीधर्म व्यक्तीची मूलतः चाणाक्ष असलेली बुद्धी बोथट बनवित असतो. आणि कोठल्याही प्रकारच्या नवीन अनुभवांपासून त्याला परावृत्त करीत असतो. म्हणजे प्रस्थापित नीतीधर्म दुरुस्त करण्याच्या ना आड येतो व नवीन नीतीधर्म आत्मसात करू देत नाही.

नीतिशास्त्रे या एक उपयुक्त संस्था आहेत. पण त्यांची उपयुक्तता कालसापेक्ष आहे. ज्या काळाला त्या उपयुक्त असतात तो काळ उलटताच त्या साह्यभूत न राहता गळ्यातले लोढणे बनून माणसाची पुढची सगळी नैतिक प्रगती खुंटून टाकतात. नैतिक शिकवणूका हा समूहाचा आवाज असतो. तो परमेश्वराचा वा इतर कोठलाही अपौरुषेय आवाज नाही. म्हणून त्यात परिस्थितीनुरूप बदल आवश्यक ठरतात.



अनुक्रमणिका



कोठालिही नैतिक शिकवणूक एकूण समूहाच्या सामुदायिक हिताच्या दृष्टीने कितीही स्तुत्य असली तरी अशा शिकवणूका तेथील प्रत्येक माणसाचा भावनिक व बौद्धिक सवयी बनतात. "कोठलेही नीतीशास्त्र म्हणजे तेथल्या व्यक्तींच्या ठिकाणी दृढमूल बनलेली त्या समाजाची सामुदायिक सहजप्रवृत्तीच होय." समुदायाचा आवाज एकदा का व्यक्तीच्या डोक्यात पक्का भिनला की त्या समाजामध्ये कोठल्याही घटकाच्या स्वतंत्र धारणाना अजिबात वाव उरत नाही. एवढेच नव्हे तर स्वतःची स्वतंत्र धारणा वापरून स्वच्छंदीपणाचे सौख्य लुटावे ही इच्छादेखील तेथे भीतीदायक वाटू लागते. :– इतरांपासून एकटे पडण्याची भीती.

समजा, तेथील कोणाच्या डोक्यात असा विचार आला की आपण इतर लोकांपेक्षा वेगळे काहीतरी करावे, वेगळे वागावे, वेगळा विचार करावा तर त्याची अवस्था काय होईल ? पहिली गोष्ट म्हणजे तो घाबरून जाईल. त्याच्या पोटात धडकी भरेल. आणि मग तो असे जगावेगळे विचार आपल्या डोक्यात का येऊ लागले याचा शोध घेऊ लागेल तेव्हा साहजिकच त्याला असे वाटेल की हे आपल्या या जन्मातल्या अथवा गतजन्मातल्या पापाचे फलित असावे. किंवा आपल्या पूर्वजांच्या पापाचे फलित असावे. ही सगळी कारणमीमांसा म्हणजे वस्तुतः स्वैर कल्पनाविलास असतो. पण हाच कल्पनाविलास दृढ झाला की त्याचे रूपांतर निरनिराळ्या प्रकारच्या प्राक्कथात घडून येते. या प्राक्कथा दृढ झाल्या की त्यांचे रूपांतर सार्वजनिक श्रद्धात होते. या श्रद्धा आपल्या प्रस्थापित आचारविचाराना बळकटी आणतात. सारांश, आमचा स्वतःचा स्वाभाविक मूर्खपणा आणि प्रत्येक घटनेसाठी काल्पनिक का होईना पण कारणमीमांसा शोधण्याचा आमचा हव्यास या दोहोंच्या परिणामातून आमची नीतीशास्त्रे दृढ व सामर्थ्यवान बनतात आणि आमच्या व्यक्तित्वाचा शेवटी कबजा घेतात.

वरील विवेचनावरून एक गोष्ट आपल्या ध्यानात येईल. ती ही की नीतीशास्त्रांचा विचार करताना नित्शेच्या डोळ्यासमोर समुदाय नसून एकेकट्या व्यक्ती असतात. त्यांच्यापुढचा प्रश्न समूहाच्या स्वास्थ्याचा नसून व्यक्तीच्या वैयक्तिक व्यक्तिविकासाचा आहे. "**बर्थ ऑफ ट्रॅजेडी**" या पुस्तकाच्या वेळी त्यांच्यासमोरचा प्रश्न यापेक्षा अजिबात वेगळा होता. तेथे ते असे प्रतिपादन करतात की माणसे गरजेपेक्षा जास्तच व्यक्तीवादी आणि फुटीर वृत्तीची असतात आणि ट्रॅजेडीच्या प्रभावाने थोडे क्षण का होईना त्यांचे मनोमीलन घडून येते. म्हणजे "**बर्थ आफ ट्रॅजेडी**" लिहिण्याच्या वेळी नित्शेंच्या पुढे प्रश्न होता तो समूहाच्या ठिकाणी अधिक उत्कट सामुदायिकत्व कसे निर्माण होईल हा. डिओनिससच्या धार्मिक उत्सवाच्या प्रसंगी जी जी मंडळी सामुदायिक नृत्यविधित व मदिरापानात सहभागी होतात ती शेवटी बेहोष होऊन स्वतःचे

अलगपण विसरून परस्परांशी जणू एकरूप बनतात. ट्रॅजेडीमध्ये नृत्य वा मदिरापान न करताच पण समोर एकूण मानवी जीवाच्या अंतिम नियतीसंबंधी जे कठोर भाष्य म्हिजनच्या–समोरील नाट्यमय दृश्याच्या रूपात प्रेक्षकांच्या पुढे आलेले असते त्या म्हिजनच्या प्रभावाने एकमेकातले बारीकसारीक मतभेद विसरून परस्परांशी मनाने एकरूप होतात. डिओनिसस उत्सव आणि ट्रॅजेडी या दोहोंचा अंतिम हेतू अशा प्रकारे एकच म्हणजे माणसामाणसातले बारीक-सारीक मतभेद मिटवून त्याना मनाने परस्परात विलिन करणे हा आहे. याचाच अर्थ असा की या काळात निन्शेना मनुष्यप्राणी फारच व्यक्तिवादी वाटत होता आणि हा व्यक्तिवाद कमी करण्याचा मार्ग ते शोधीत होते. म्हणजेच मनुष्यप्राणी प्रारंभी एकेकट्या विचाराचा असतो व मागाहून गरजेपोटी एकत्र येऊन तो समुदाय स्थापन करतो असे त्या काळात त्याना वाटत होते. मागाहून त्यानी हे मत बदलले आहे. मागाहून त्याना असे वाटू लागले आहे की माणसे फारच एकछापी बनली आहेत. त्यांच्यात वेगळेपणा कसा तो उरलेला नाही. ती व्यक्तीवादी बनतील तर अधिक बरे.

अनेक समाजशास्त्रीय तत्त्वज्ञाने पृथक् व्यक्ती आधी व समूह मागाहून असा सामाजिक जडणाचा क्रम पाहातात. जणू काही सगळे सामाजिक संबंध हे ज्याच्या त्याच्या स्वेच्छेचा भाग असतात व कोणाला जर ते नको असतील तर त्यातून बाहेर पडण्याचे स्वातंत्र्य त्याला असते. निन्शेना हा प्रबंध मान्य नाही. ते म्हणतात की माणसाची भाषा व माणसाची जाणीव या दोन्ही गोष्टींचा उगम त्याच्या सामाजिकतेत आहे. प्रारंभापासूनच मनुष्यप्राणी जर कळपाकळपाने राहात नसता, इतर रानटी प्राण्यांच्या तुलनेत शारिरीकदृष्ट्या जर तो अशक्त नसता आणि म्हणून स्वतःसमारख्या इतर मनुष्यप्राण्यांच्या सहकार्याची आवश्यकता जर त्याला भासली नसती तर त्याने भाषाही तयार केली नसती व त्याच्या ठिकाणी जाणीव-शक्तीचाही प्रादुर्भाव झाला नसता. सामुदायिक जीवनपद्धतीतून भाषा व जाणीव-शक्ती माणसाला मिळाल्या. मानवजातीच्या जीवनाचा प्रारंभ सामुदायिक स्वरूपाचा असून व्यक्ती म्हणून व्यक्तीचा उदय ही नंतरच्या काळातील घटना आहे.

मानवजातीच्या प्रारंभाच्या काळात समूह किंवा कळपाचे वर्चस्व होते. व्यक्ती तेव्हा पूर्णतया कळपाच्या आयुष्यक्रमात विलीन झालेली असे. समजा, एखादी व्यक्ती कळपाशी त्या काळात जर फटकून वागू पाहाती तर कळपाने तिला नष्ट केले असते. एवढेच नव्हे तर कोणी एखादा कळपातल्यापेक्षा थोडा जरी भिन्न दिसला असता तरी त्यालाही त्या कळपाने जिवंत ठेवले नसते. कळपापेक्षा वेगळा म्हणजे कळपाला धोका ही तेव्हाची मानवजातीची धारणा होती. अर्थात वेग-वेगळ्या भाषा बोलणारे व वेगवेगळ्या कल्पना धारण करणारे असंख्य वेगवेगळे कळप जगाच्या पाठीवर तेव्हा असत. कळपातल्या सर्व लोकांची भाषा व एकूण

जीवनदृष्टी सारखी. मात्र कळपाबाहेरच्या इतर लोकांच्या भाषेपेक्षा व जीवनदृष्टीपेक्षा वेगळी असा तेव्हाचा एकूण प्रकार होता प्रत्येक कळप त्याच्या जीवनरहाटीला पोषक ठरेल अशा प्रकारचे नैतिक आचारविचार ठरवी. म्हणून कळपातल्या साऱ्यांचे आयुष्य एकछापी असे. पण इतर कळपांपेक्षा ते त्याच वेळी भिन्नही असे.

"ज्या लोकाना स्वतःच्या इष्टानिष्ट कल्पना ठरविता येत नाहीत ते लोक स्वतःचे आयुष्यही सांभाळू शकत नाहीत. परंतु जेव्हा त्याच लोकाना इतरांबरोबरची स्वतःची भिन्नता टिकवून धरायची असते तेव्हा त्यांच्या इष्टानिष्ट कल्पना त्यांच्या शेजाऱ्यांच्या इष्टानिष्ट कल्पनांपेक्षा भिन्न असाव्या लागतात."

"एक लोकसमुदाय ज्या ज्या प्रकाराना सुंदर आणि सन्मानीय मानतो त्यातल्याच अनेकाना तसलाच दुसरा लोकसमुदाय नावे ठेवतो. कुरुप म्हणतो. लज्जास्पद समजतो. येथे ज्याला "पाप म्हटले जाते त्यालाच इतरत्र 'पुण्य' म्हटले जाताना मी अनेकवार पाहिले आहे." ( दस स्पेक झरथुष्ट्र. )

"प्रत्येक जमातीच्या डोक्यावर त्या त्या जमातीचा नैतिक कायदा लटकत असतो." ( दस स्पेक झरथुष्ट्र )

नित्शे म्हणतात की नैतिक कायदे मानवी समाजांबरहुकूम बदलतात. म्हणजे मानवी नैतिक वर्तन सापेक्ष आहे. नव्हे मनुष्याने काहीही केले तरी ते सापेक्षच राहाणार आहे. कारण त्याचा संबंध मनुष्याशी आहे. निसर्गाशी किंवा सृष्टीशी नाही. त्यांचा उगम सृष्टीत नाही; माणसांमध्ये आहे.

प्रत्येक जमातीचे स्वतःचे नैतिक शास्त्र असते. हे नैतिकशास्त्र ती जमात स्वतःच्या भौतिक गरजांनुसार तयार करते. मनुष्यापेक्षा मनुष्याव्यतिरिक्त अधिक मोठी शक्ती या सृष्टीमध्ये अस्तित्वात नाही. मनुष्ये किंवा जो तो सामाजिक गट स्वतःच स्वतःला '**पाप–पुण्याचा**' कायदा देत असतो. आपण कितीही शोध घेतला तरी हा कायदा त्या तिथे, बाहेर सृष्टीच्या ठिकाणी सापडणार नाही. किंवा स्वर्गात राहणारी कोठली देवताही मनुष्याला तो देणार नाही. हा कायदा तयार स्वरूपात मिळतच नाही. अर्थात प्रत्येक जमात आम्हाला तो परमेश्वराकडून मिळाला किंवा परमेश्वराच्या दूताने आम्हांला तो दिला असे सांगते ही गोष्ट खरी. मनुष्ये स्वतःच बाहेरच्या वस्तूंचे मूल्य ठरवतात आणि त्याच मूल्यांच्या जोरावर स्वतःला तारतात. "मनुष्ये प्रथम मूल्यांचे जग निर्माण करतात व मागाहून स्वतःला निर्माण करतात." अगदी पहिल्याने सगळी जमात निर्माणकार असे. मागाहून एकेकटया व्यक्ती निर्माणकार बनल्या." सारांश, मूल्यमापन म्हणजेच माणूस बनणे. आत्मनिर्माण.

अगदी प्रथम मनुष्याच्या ठिकाणी स्वतःच्या वेगळेपणाची जाणीवच जेव्हा निर्माण झाली नव्हती, मनुष्य जेव्हा पूर्णपणे सामुदायिक स्वरूपाचा होता तेव्हा



अनुक्रमणिका

जे जे समुदायाच्या सामुदायिक हिताच्या विरुद्ध असे ते ते पाप मानले जात होते.

प्रत्येक कळप स्वतःच्या घटकाना बाहेर तुम्ही काय पाहाल आणि जे पाहाल ते कसे पाहाल याच्या गर्भित सूचना देतो. कळप, भाषिक आणि विशिष्ट दृष्टीकोनांची चौकट अशा दुहेरी चौकटीत जन्मतात, राहातात, वावरतात, वाढतात. या चौकटी चांगल्यावाईटाचे, न्यायान्यायाचे, पापपुण्याचे निर्देशन करतात. थोडक्यात जगाचे आणि जगाबरोबरच्या व स्वतःबरोबरच्या तुमच्या संबंधांचे एक प्रकारचे प्रच्छन्न वर्णनच कळप तुम्हाला देतात: देवाधर्माची भीती, पापाची भीती, या जन्मातल्या कर्मांची फळे पुढील जन्मात भोगावी लागतात अशा भीती, अशा नाना गोष्टी प्रत्येक समूह आपल्या घटकांच्या मनात भरवून देतात. या कल्पनांच्या अमलाखाली आपण आहोत हेही मनुष्याच्या सहसा ध्यानात येत नाही. स्वतःच्याही नकळत आपल्या समाजात प्रचलित असणारे हे ग्रह आणि आग्रह आपण उचलतो व त्यानुसार वागत राहातो. भाषा शिकता शिकता आपण या प्रकारचे अनेक पूर्वग्रह, या पूर्वग्रहात नैतिक पूर्वग्रहही मोडतात, आत्मसात केलेले असतात. आपणाला जेव्हा वाटत असते की आपण मोठ्या विचाराने वागत आहोत तेव्हा बरोबर तर आपण या आणि अशाच अनेक पूर्वग्रहांच्या तंत्राने वागत असतो. भाषेचा उगम एकमेकांबरोबरच्या संवादासाठी झालेला असल्याने व जाणीवदेखिल त्याच कारणासाठी मनुष्याच्या ठिकाणी उत्पन्न झालेली असल्याने जाणीवेचा आवाका हा केव्हाही भाषेच्या आवाक्याएवढाच असतो.

आपल्या भाषा आणि आपली नीतीशास्त्रे दोन वेगवेगळ्या बाजूनी आपले सगळे जागृत आयुष्य नियंत्रित करीत असतात. कळपाचे आयुष्य ज्या कृत्यामुळे धोक्यात येण्याची शक्यता असते असे कोठलेही कृत्य करावयास भाषा व नीतीशास्त्र आपणास बंदी घालतात. नव्हे, मनात तसा विचारही ती येऊ देत नाहीत. कारण भाषेचा व जाणीवेचा विकासच कळपाला मध्यवर्ती धरून घडून आलेला असतो. कळपाचा पवित्रपणा तेथील मनुष्यांच्या डोक्यात इतका काही भिनलेला असतो की असा एखादा समाजविरोधी विचार तेथील कोणाच्या डोक्यात चुकूनदेखील आला तरी तो मनुष्य बेचैन होतो. त्याला ते पाप आणि गुन्हा वाटतो. अर्थात काही झाले तरी प्रत्येक कळपातल्या काही ना काही लोकांच्या डोक्यात अशा प्रकारचे बंडखोर विचार येत राहातील यातही शंका नाही. कारण माणसाला विकार–affect स्वाभाविक आहेत. कितीही जरी ते दडपून टाकले तरी अधूनमधून ते डोके वर काढल्यावाचून राहात नाहीत. दुसरी गोष्ट अशी की कोठलेही सामाजिक नियंत्रण हे विकारांचे नियंत्रण नसते. ते विकारांच्या विवक्षित आविष्कारांचे नियंत्रण असते. एखाद्या ठिकाणी एखाद्या विशिष्ट प्रेरणेला धिक्कार असेल. दुसरीकडे तिचाच गौरवही होणे शक्य आहे.





प्रत्येक समाजाच्या नैतिक कल्पना भिन्न भिन्न असतात. एकीकडे ज्याला 'सुष्ट' म्हणतात त्यालाच दुसरीकडे 'दुष्ट' म्हटले जाणे अगदी शक्य आहे. संपूर्ण मानवजात विचारात घेता असे म्हणता येईल की जगात कोठलीही प्रेरणा त्याज्य नाही. येथे नाही तर तेथे तिला वाव असेल. प्रेरणा व विकार प्राण्याला स्वाभाविक आहेत. एखाद्या समाजात यापैकी काही प्रेरणाना मान्यता असल्याने त्या प्रेरणा तेथे उघडपणे वावरताना दिसतील. पण दुसऱ्या प्रेरणा निषिद्ध असल्याने तेथील लोकांच्या मनात प्रच्छन्नपणे वावरतील. प्रेरणा नियंत्रित करणाऱ्या यंत्रणेच्या म्हणजेच नीतीशास्त्रांच्या प्रभावावर हे अवलंबून असेल. प्रेरणांच्या बाबतीत दुसरी महत्त्वाची गोष्ट ही की निषिद्ध ठरलेल्या प्रेरणा जेथे त्यांचा निषेध केला जातो तेथेही जर सुप्त रूपात अस्तित्वात असू शकतात तर त्याचा अर्थ हाच नाही का की प्रेरणा तत्वतः अमर आहेत? तेव्हा प्रेरणांचे किंवा विकारांचे निर्मूलन ही एक अशक्य गोष्ट आहे. तसेच ती एक अनैसर्गिक अशीही गोष्ट आहे.

नीतीशास्त्रे विकाराना दडपून त्यांचे निर्मूलन करू पाहातात. पण हे त्यांचे वागणे अनैसर्गिक आहे असे नित्शे म्हणतात. मग त्याचा अर्थ असा होतो काय की विकारांचे स्वच्छंदी वागणे नैसर्गिक आहे? जर तसे असेल तर लहान मुले, पशू आणि गुन्हेगार या सर्वांचे वर्तन नैसर्गिक अतएव स्तुत्य ठरेल. पण नित्शेना तसे म्हणायचे नाही. नित्शे विकार दडपून टाकण्याच्या विरुद्ध आहेत. विकार दडपून टाकल्याने विकार विकृत बनतात व ती व्यक्ती मानसिकदृष्टया आजारी बनते. नित्शे विकार दडपून टाकण्याऐवजी विकाराना वळण लावण्यावर भर देतात. नैतिक यमनियम नकोत असे ते कोठेही म्हणत नाहीत. उलट ते असे म्हणतात की मनुष्याने असे यमनियम प्रथम बनविले आणि त्याने पशुत्वातून मनुष्यत्वात पहिले पदार्पण केले. हे यमनियम तो जर बनविता ना तर आजवर तो पशूच राहिला असता.

नित्शेंचा आक्षेप विकारांच्या खंडनावर आहे. ते म्हणतात की विकार असणे ही गोष्ट मनुष्याला अगदी स्वाभाविक आहे. मनुष्य म्हणजेच मनुष्याचे विकार. विकार नष्ट करणे म्हणजे मनुष्यालाच नष्ट करणे. मनुष्याचा अर्ध-मनुष्य बनविणे. विकार दडपल्यास ते विकृत आणि रोगट बनतात.

नित्शे पॅशन्स किंवा विकार दडपून टाकण्यात येऊ नयेत असे जरी म्हणत असले तरी त्याना अनिर्बंध वाव द्यावा असेही म्हणत नाहीत. ते म्हणतात की "विकारांच्या तुम्ही आहारी जाता तेव्हा एक वेळ अशी येते की जेव्हा विकार मलिन बनतात आणि स्वतःबरोबरच स्वतःच्या मालकालाही घाणीत ओढतात." नित्शे डायोनिससच्या तत्वज्ञानाचा व आत्मतल्लीनपणाच्या वेहोषीचा पुरस्कार करीत असले तरी ते रानटी, क्रूर, बेभानपणाला मान्यता देत नाहीत.





संगीत ऐकतानाचा तल्लिनपणा आणि दारूची बेहोषी यात ते फरक करतात. डायोनिसस अवस्थेतल्या बेभानपणावर अपोलो या विचारदेवतेचा वैचारीक ताबा आहे. नित्शेंच्या मते डायोनिसस अवस्था ही हेलेनाइज्ड–सुसंस्कृतपणाची डायोनिसस अवस्था आहे. मनुष्य नीतीअनीती विसरून परत एकदा पशुत्वाकडे गेल्याने त्याचा उद्धार होणार आहे असे नित्शे मानत नाहीत. त्यांचा भर एकांगी निषेधापेक्षा दोन्ही बाजूंच्या सुसंबद्ध सिंथेसिसवर–समन्वयावर आहे; दोन्ही बाजूतील सर्व गोष्टी टिकवून त्यांचा अधिक उच्च प्रकारचा समन्वय घडवून आणण्यावर आहे. हा समन्वय ही केवळ 'अ' व 'ब' ची एकत्रित बेरीज नसेल. तर ते नवनिर्माण असेल. तीत केवळ संख्यात्मक भेद नसून गुणात्मक भेद असेल.

आजच्या मनुष्याने रिप्रेशन किंवा मानसिक प्रतिरोध टाकून दिल्यास तो उच्च प्रकारचा मनुष्य बनेल असे नित्शे म्हणत नाहीत. त्याचप्रमाणे विकाराचा मानसिक प्रतिरोध केल्यास म्हणजे चालू धार्मिक आदर्शानुरूप स्वतःचे खच्चीकरण त्याने केल्यास तो तसा बनेल असेही ते म्हणत नाहीत. नित्शे म्हणतात की नैसर्गिक प्रवृत्तींवर (= विकारांवर) जर तुम्ही अधिक समंजस कबजा मिळविलात तर तुम्ही आजच्यापेक्षा अधिक वरच्या अवस्थेला पोहोचाल. मानसिक निग्रह आणि मानवी दृढनिश्चयाचे मोठेपण सांगताना ते लिहितात की, "स्वाधिनता, बौद्धिक तरलता, पराक्रम, आणि असामान्य दृढनिश्चयीपणा यांचे द्योतक जगात जे जे काही आज आहे किंवा पूर्वी कधी होते ते ते सर्व, मग ते विचाराच्या जगतातले असो वा सत्तेच्या जगतातले असो अथवा वाक्पटुत्वाच्या जोरावर इतरांचे मन वळविण्याच्या, कलेच्या वा नैतिकतेच्या अशा कोठल्याही क्षेत्रातले असो ते ते सर्व सामुदायिक सक्तीतून नव्हे तर त्या त्या व्यक्तींने स्वतःच स्वतःला जी शिस्त लावली होती, स्वतःवर जी बंधने लादून घेऊन त्यांचे कठोर पालन केले होते त्या शिस्तीतून व बंधनातून निष्पन्न झालेले आहे. किंबहुना मनचाहेपणा नव्हे तर स्वयंशासन, स्वतःच स्वतःला लावून घेतलेली कडक शिस्त हेच खरोखर नैसर्गिक व सृष्टीक्रमानुसार होय असे म्हणता येईल."

स्वैर आणि अनिर्बंध वागल्याने नव्हे तर स्वतःच स्वतःला कडक शिस्त लावून घेतल्यानेच [illegible] सगळ्या महान गोष्टी जगात निर्माण होत असतात ही कल्पना नित्शेंच्या विचारसरणीच्या केंद्रस्थानी आहे. अगदी आरंभापासून ते थेट शेवटपर्यंत. "[illegible] नव्या जागी प्रथमच [illegible] निर्माण करणारा वसाहतकार [illegible] मोकळ्या पाणथळ जमिनी आणि जंगलेच्या जंगले स्वतःच्या [illegible] स्वतःच्या विकारांवर ताबा चालविणारा मनुष्य-[illegible] प्रस्थापित करीत असतो." ([illegible]) "[illegible] कार्याला [illegible] शेवटी काहीतरी

भरीव आणि गौरवस्पद निर्माण होऊ शकते व स्वतःचे सगळे जीवन सार्थ बनते— उदा. मानवी सद्‌गुण, कला, संगीत, नृत्य, आध्यात्म, तत्वज्ञान. कशाचीही उपासना करा. पण ती निष्ठेने, एकाग्रचित्ताने करा.''

शारिरीक प्रवृत्तींकडे पाहाण्याचा नित्शेंचा दृष्टीकोन इतर अनेक नैतिक तत्ववेत्त्यांपेक्षा अधिक निकोप आहे. ते म्हणतात को मनुष्यातून जर अधिक दिव्य आणि भव्य असे काही घडून यावयाचे असेल तर त्याच्या प्रेरणा खच्ची करून चालणार नाही. प्रेरणा ही तर मनुष्याची खरी शक्ती आहे. प्रेरणा खच्ची न करता त्याना वळण देता आले पाहिजे. आपल्या आवडीच्या प्रतिक्रावरहुकूम वळण. प्रेरणांचे उदात्तीकरण.

दोन अगदी सर्वस्वी मूर्ख प्रकारे प्रेरणांचा प्रश्न हाताळण्याचा प्रयत्न होतो. काही लोक स्वैराचारातून प्रेरणांचा उद्धार करू पाहातात. त्यांच्या मते कोठल्याही प्रेरणेला जर मुक्त वाव दिला, तिला जर आपण कोठल्याही प्रकारची अडकाठी केली नाही तर शेवटी त्या प्रेरणेची तृप्ती होऊन ती आपल्या आहारी येईल. व तिच्या साहाय्याने अनेक महान गोष्टी आपण साध्य करू शकू. उदा. आपला राग, लोभ, मोह, मद, मत्सर याना जर आपण स्वैरपणे वागू दिले तर त्यातून अनेक मोठमोठ्या गोष्टी साध्य होतील. स्वैराचाराच्या किंवा अनिर्बंध आविष्कार-वादाच्या उलट खच्चीकरणवादी बोलतात, ते प्रेरणांच्या प्रचंड आवेगाना घाबर-तात. ते असे म्हणतात की प्रेरणाना वाव देण्यापेक्षा त्याना बांध घातला पाहिजे, शक्यतोवर ज्या ज्या प्रेरणा अनैतिक आहेत त्यांचे मनुष्यप्राण्यातून उच्चाटण करा-दयास हवे. प्रेरणांचे उच्चाटण करण्यातच मानवजातीचे हित आहे. नित्शेना ह्या दोन्हीही विचारसरणी मूढपणाच्या वाटतात.

नैतिक मूल्यासंबंधिची नित्शेंची संपूर्ण भूमिका एव्हाना आपल्या ध्यानात आली असेलच. नित्शे मानसिक प्रतिरोधाचा जितका निषेध करतात तितकाच स्वैराचाराचाही निषेध करतात. त्याना संतुलित, आयुष्यक्रमाची इच्छा आहे. त्यांचे म्हणणे असे की प्रत्येक मनुष्य विलू-टू-पॉवरपासून बनलेला असल्याने व विल्-टू-पॉवरला नीतीअनिती, सुष्टदुष्ट-यापैकी काहीच कळत नसल्याने (कारण विल्-टू-पॉवर ही प्रथमतः केवळ ऊर्जा आहे. आकार-वाचक ऊर्जा) सुष्टपणाच्या दृष्टीने दुष्टपणा खच्ची करू पाहाणे म्हणजे मूळ विल्लाच धक्का पोचविणे. मनुष्य हे जसे विल्-टू-पॉवरचे एक वळण आहे तशाच प्रकारे मूल्यव्यवस्था यादेखिल त्याच विल्‌ची वळणे होत. म्हणून एका मूल्याच्या नावे विल् खच्ची करणे म्हणजे इतर संभाव्य मूल्याना धक्का पोचविणे. असा धक्का न पोचविता विल् सुरक्षित राखून त्याच्यात जास्तीत जास्त विकास साधणे हे मनुष्याचे खरे कर्तव्य आहे. नित्शेंची भूमिका अशा प्रकारे अधिक सावधगिरीची आहे.



अनुक्रमणिका

विल्-टू-पॉवर ही एक सर्वांगीण शक्ती असली तरी त्या शक्तीला मूलतः दोन अंगे आहेत-एक केवळ उर्जेचे म्हणजे निखळ गतीचे-दुसरे केवळ आकारिक म्हणजे निव्वळ स्थितीचे. ही दोन्ही अंगे परस्परांशी स्पर्धा करीत परंतु एकत्र राहातात. नवनिर्माण गती व स्थिती यांच्या संतुलित मिलाफातून घडते. केवळ गती अराजकाला प्रोत्साहन ठरेल. केवळ स्थिती अचेतनत्वाला. स्वैरतावादी केवळ गतीला महत्व देतात. स्थितीवादी प्रेरणांच्या प्रतिरोधाला. स्थिती-गतीच्या संघर्षमय समन्वयाची अवस्था ही अर्थात अधिक उच्च अवस्था आहे.

नित्शे म्हणतात की विकार मनुष्याला नैसर्गिक असल्याने त्यांचे खंडन न करता त्यांना विचारपूर्वक शिस्त आणि वळण लावूनच त्यांचा उद्धार करावयास हवा. योडायान, अपोलो आणि डायोनिसस ही जी दोन संघर्षात्मक तत्वे आहेत त्यांचे योग्य प्रकारे संमीलन घडवून आणणे इष्ट होय. विकार आणि विचार या दोघानाही मनुष्याच्या ठिकाणी त्यांचे त्यांचे स्थान आणि महत्व मिळाले पाहिजे. नित्शेप्रणीत हा नैतिक आदर्श अर्थात अत्यंत पारंपरिक आहे.

मात्र त्याच्या पाठीमागे जी मानसशास्त्रीय बैठक आहे ती तितकीच नवी आहे. पारंपरिक नैतिक आदर्शात जीवन सुखी करण्याच्या कल्पनेला मध्यवर्ती स्थान असते. 'विवेकाने आणि नीतीने वागा.' कशासाठी ? 'आयुष्य सुखाचे जावे' म्हणून-शेवटचा दिस गोड व्हावा म्हणून. नित्शेंच्या मते सुख वा दुःख हा मानवी आयुष्याच्या संबंधातला महत्वाचा प्रश्नच नाही. फक्त मूर्खच सुखासाठी जगतात. नित्शेंच्या मते जीवनाची प्रगल्भता हा मानवी जीवनाच्या संबंधातला सर्वात महत्वाचा प्रश्न आहे. त्या दृष्टीने विचार केल्यास विकारांचे निर्मूलन चूक ठरते. कारण असा मनुष्य 'पंगू' असतो.

आम्ही नीतीनियम पाळतो. पण ते बुद्धीला पटतात म्हणून किंवा त्यांच्यामुळे आपले जीवन प्रगत होत चालले आहे म्हणून नव्हे. हजार हिश्शानी आम्ही नैतिक नियम केवळ कसल्यातरी काल्पनिक भीतीपोटी-परमेश्वर, कर्मविपाक-पाळीत असतो. जीवनाची प्रगती, जीवनाचे उदात्तीकरण हा अशा बाबतीतला आपला एकमेव निकष हवा. पण हा निकष आपण कधीच विचारात घेत नाही. एक प्रत्यक्ष उदाहरणच घेऊ. साधी गोमांसभक्षणाचीच गोष्ट घेऊ. हिंदू गाईचे मांस खात नाहीत. पण हे मांस खाल्ल्याने शरीराला व मनाला कसला अपाय घडतो म्हणून ते मांस आपण खात नाही असे नसून आमचा धर्म ( म्हणजे आमच्या धर्माच्या पाठीमागचे बौद्धिक अधिष्ठान ) मांस खावू नका असे सांगतो म्हणून आपण ते मांस खात नाही. हे अधिष्ठान ( मेटॅफिजिक्स ) अगणित वर्षापूर्वी तयार झाले आहे. जीवनात त्यानंतर अनेक कलाटण्या घेतल्या आहेत. परंतु तरिही आम्ही जुन्याच मेटॅफिजिक्सच्या तालाने जगत आहोत. नित्शेंच्या म्हणण्याप्रमाणे आपण या

मेटॅफिजिक्सच्या मागे जावयास हवे व परत एकदा निर्विकार व स्वच्छ दृष्टीने जीवनाचा विचार केला पाहिजे. जीवनाचे वातावरण बदलते तेव्हा आपल्या वाटण्यात ( फिलिंगमध्ये )ही बदल घडून यावा लागतो. वर म्हटली तसली मेटॅफिजिक्स या बदलांच्या आड येतात. ती विकारांचा प्रतिरोध शिकवितात आणि प्रतिरोध शिकवून नव्या बदलांसाठी, समजा, ज्या प्रेरणा व विकार कदाचित आवश्यक ठरले असते त्याना मारून टाकतात. परिणामी पुढची सगळी प्रगतीच नष्ट करून टाकतात. विकारांची समंजसपणाने केली जाणारी हाताळणी ही मानवी जीवनाला जास्त हितकारक आहे. कारण जीवनाची शक्ती विचारात नसून विकारात आहे. म्हणून विकार तुच्छ लेखून चालणार नाही. विकारांकडे निरागस व शुद्ध दृष्टीनेच पाहिले गेले पाहिजे.

नैतिक विचारावाचून मनुष्याचे चालणारच नाही. नैतिक बंधने नसतील तर मनुष्य मनुष्य म्हणून टिकणारच नाही. परंतु ही बंधने आम्ही भीतीपोटी पाळतो की प्रेमापोटी हा खरा महत्त्वाचा प्रश्न आहे. मी मनुष्य आहे, मनुष्याने या परिस्थितीत अशाच प्रकारचे वर्तन केले पाहिजे असे म्हणून स्वतःबद्दलच्या रास्त अभिमानासाठी एखादा मनुष्य नैतिक वर्तन करील. दुसरा मनुष्य काठीच्या ( शासनाच्या, देवाधर्मांच्या, कर्मविपाकाच्या तत्त्वज्ञानाच्या ) भीतीपोटी अगदी तसेच वर्तन करील. या दोन वर्तनात मूलभूत फरक आहे. पहिल्याचे वर्तन केव्हाही स्तुत्य ठरते. दुसऱ्याचे तसे स्तुत्य ठरणार नाही. कारण काठीची भीती नसेल तर दुसरा ते वर्तन करीलच असे नाही. अनेक मनुष्ये नीतीने ( म्हणजे त्यांच्या समाजात जे नैतिक नियम प्रचलित असतात त्या नियमांनुसार ) वागताना आपण पाहातो. परंतु हे वागणे बऱ्याचदा केवळ सामाजिक वा धार्मिक भीतीपोटी असते. त्यांच्या प्रेरणांचे स्वाभाविक वळण म्हणून नव्हे. नित्शेचा भर अशा प्रकारच्या स्वाभाविक वळणावर आहे. प्रेरणा दडपून टाकल्याने एकतर त्या प्रेरणा आडमार्गाला जातात व दुसरे म्हणजे कदाचित नव्या परिस्थितीत त्याच प्रेरणांची गरज असल्यास त्या वेळी त्या उपलब्ध राहात नाहीत.

अर्थात जुन्या नैतिक शास्त्रात ज्याप्रमाणे स्वयंशासनावर आणि आत्मजयावर भर देण्यात येत असे तसाच भर या नव्या नैतिक शास्त्रातही देण्यात येतो. मात्र एकात ही शिस्त बाह्य भीतीच्या आधारे लावण्यात येत. तर दुसऱ्यात तीच स्वेच्छेने लावून घेण्यात येते. एका ठिकाणी मनुष्य प्रथमपासून शेवटपर्यंत नैतिक बाल्यावस्थेत राहातो. तर दुसऱ्या ठिकाणी स्वतःच्या प्रयत्नाने प्रौढ बनता येण्याची संधी त्याला दिली जाते. एक गोष्ट मात्र मान्य करावयास हवी की जगातली सर्व मनुष्ये स्वयंशिस्तीच्या मार्गाने जाऊ शकतील असे नित्शेसुद्धा म्हणत नाहीत. बहुसंख्य लोकांसाठी बाह्य सामाजिक निर्बंध हवेत याच विचाराचे तेही आहेत.

येथे नित्शेप्रणीत मास्टर–मोरॅलिटी व स्लेव्ह-मोरॅलिटीचे तत्व समजावून घ्यावयास हवे. पण त्याच्याही पूर्वी नित्शेंची माणसाच्या एकूण धारणेसंबंधिची–माणसाच्या प्रतिमेसंबंधिची कल्पना समजावून घ्यावयास हवी. नित्शे माणसाला केवळ विचारशील प्राणी मानीत नाहीत. त्यांच्या दृष्टीने माणूस म्हणजे माणसाच्या प्रेरणा, त्याचे विकार, त्याचे अ‍ॅफेक्टस. अंतिम विश्लेषणात फक्त विकार तेवढे राहतात. माणसाचा विचार त्याच्या विकारव्यवस्थेच्या संदर्भात करावयास हवा. बौद्धिक व तार्किक विचार नव्हे तर मनुष्याच्या शारिरीक प्रेरणा, त्याचे विकार आणि त्याच्या भूका त्याच्या आयुष्याला चालना देतात, दिशा देतात, शक्ती पुरवितात असे नित्शे म्हणतात.

प्रेरणांच्या संबंधात दोन मूलभूत गोष्टी नित्शे गृहित धरतात. एक म्हणजे प्रेरणा संपूर्ण मानवजातीला समान असून व्यक्तीगणिक त्यांच्या शक्तीत कमी-जास्तपणा आढळतो. आणि दोन, आपण काहीही केले तरी या प्रेरणा नष्ट करता येत नाहीत. एखाद्याला ठार मारले किंवा पार जायबंदी केले तरच त्यांच्या स्वरूपात बदल करता येतो. एखाद्याच्या प्रेरणा जर क्षीण असतील तर कृत्रिम-रित्या त्या प्रभावी करता येत नाही. तसेच प्रबल प्रेरणाना कृत्रिमरीतीने क्षीण बनविता येत नाही. प्रेरणांची अंगभूत शक्ती शेवटपर्यंत कायम टिकून राहाते. ' अ ' ही प्रेरणा तुम्ही घेतली. ' अ 'ची मूळ शक्ती ' ब ' इतकी आहे. तुम्ही काहीही केले तरी ही शक्ती ' ब ' पेक्षा कमी करता येणार नाही अथवा वाढ-विताही येणार नाही. ती शेवटपर्यंत ' ब ' इतकीच राहील.

समजा, आक्रमकपणाच्या प्रेरणेचा विचार आपण करीत आहोत. या प्रेरणे-संबंधी दोन प्रकारची परिस्थिती संभवते. एका सामाजिक परिस्थितीत या प्रेरणेला वाव मिळण्यासारखी स्थिती आहे. समजा, आजूबाजूला लढाऊ लोकांचा भरणा असून त्यांच्याबरोबर दोन हात करीत तेथे आयुष्य काढायचे आहे. या परिस्थितीत मूलतः आक्रमक असलेला मनुष्य पराक्रम दाखवून मोठेच नाव काढू शकेल. समजा, हाच इसम शांतताप्रिय समाजात जन्मला आला आहे. आता त्याला आक्रमकपणा दाखवायला वावच नाही. कारण ज्याच्या विरुद्ध तलवार गाजवावी असा शत्रूच त्याच्या आजूबाजूला नाही. शत्रू नाही म्हणून तेथे दांडगेपणाला सद्‌गुणही मानले जात नाही. उलट दांडगेपणा, हिंसाचार हा तेथे दुर्गुणच गणला जात आहे. या वेगळ्या परिस्थितीत बऱ्याच आक्रमक मनुष्याला आक्रमकपणाने तर वागता येणार नाहीच उलट आक्रमकपणाला तेथे दुर्गुण मानले जात असल्याने बऱ्याच प्रमाणात स्वतःच्या आक्रमक स्वभावाला मुरड घालावी लागेल. अशा परिस्थितीत एकतर तो मनुष्य स्वतःचा आक्रमकपणा आतल्या आत कोंडून धरील आणि मानसिकदृष्ट्या आजारी बनेल. किंवा समाजाचा आदेश धुडकावून पुंड व गुंड बनेल. म्हणजेही परत मानसिकदृष्ट्या आजारीच !



अनुक्रमणिका



सारांश, कोठल्याही शारिरीक प्रेरणांच्या बाबतीत दोन गोष्टी घडताना आपल्या नजरेस पडतात. एकतर ती प्रेरणा पार खच्ची करून टाकण्याचा प्रयत्न होतो. किंवा तिला मुक्तवाट देण्याचा प्रयत्न होतो. प्रेरणेला स्वैर मोकळीक दिल्यास समाजाला हानी पोचते. आणि खच्चीकरण केले गेल्यास व्यक्तीला हानी पोचते. परंतु प्रेरणांकडे अधिक समंजसपणे पाहता आल्यास त्याच प्रेरणा समाज आणि व्यक्ती या दोघांच्याही हिताच्या दृष्टीने वापरता येणे शक्य आहे—स्वैर वाट आणि पूर्ण खच्चीकरण या दोन टोकांच्या दरम्यान उन्नयनाच्या अगणित छटा अस्तित्वात आहेत.

नैतिक शास्त्राचा शास्त्र म्हणून विचार करता असे दिसून येते की या शास्त्राच्या साहाय्याने म्हणजेच सामाजिक परंपरांच्या साहाय्याने त्या त्या विशिष्ट समाजतल्या लोकाना किंवा त्या लोकांच्या मनोविकाराना सामाजिकदृष्टचा हितकारक असे वळण लावता येते. म्हणजेच सामाजिकदृष्टचा हितकारक प्रकारे मनोविकारांचे उत्सर्जन घडवून आणता येते. ढोवळपणे पाहिल्यास असे म्हणता येईल की कोठलेही नैतिकशास्त्र म्हणजे मानवी प्रेरणांवर उमटविला गेलेला एकएक आकार होय. या आकाराच्या साहाय्याने मानवी मनातील काही शक्तीना समाजहितकारक वळण देण्यात येते. ( म्ह० शक्तीचा शक्तीबरोबरचा संघर्ष० वैयक्तिक विल्–टू–पॉवरविरुद्ध सामुदायिक विल्–टू–पॉवर. ) नैतिक शास्त्राच्या स्वरूपावर एखादा समाज समाधानी वा असमाधानी, संतुष्ट वा असंतुष्ट असणार आहे हे ठरते. जे नीतीशास्त्र आपल्या घटकांच्या प्रेरणाना योग्य ती मुभा देते, त्यांच्या वाजवी प्रेरणांचा कोंडमारा करीत नाही ते नीतीशास्त्र स्वतःच्या घटकाना संतुष्ट व समाधानी जीवनाची संधी प्राप्त करून देते असे म्हणता येईल. याच्या उलट जे नीतीशास्त्र आपल्या घटकांच्या नैसर्गिक प्रेरणांवर वाजवीपेक्षा अधिक निर्बंध लादते ते नीतीशास्त्र तितक्या प्रमाणात स्वतःच्या घटकाना असंतुष्ट व असमाधानी बनावयास प्रवृत्त करते. पहिल्या प्रकारच्या नीतीशास्त्राला जर आपण निर्माणशील नीतीशास्त्र हे विशेषण लावले तर दुसऱ्या प्रकारच्या नीती-शास्त्राला विघातक आणि विकृतीकारक हे विशेषण आपण लावू.

एखाद्या काल्पनिक सामाजिक नमुन्याची तपासणी केल्यास नीतीशास्त्रे आपापल्या घटकांचे जीवन कसे निर्बंधित करतात, कसे घडवितात आणि कसे संतुष्ट वा असंतुष्ट बनवितात हे आपल्या ध्यानात येईल. आपण घेत आहोत ते उदाहरण अशा प्रकारच्या आदर्श म्हणजे एकांतिक स्वरूपाच्या समाजाचे आहे. असा समाज पृथ्वीतलावर कोठेही आपणास गवसणार नाही. माणसाच्या ठिकाणी अनेक प्रेरणा असल्या तरी चर्चेच्या सोयीसाठी आपण फक्त आक्रमकपणाच्या एकाच प्रेरणेचा विचार येथे करू. नित्शेच्या वर्चस्वे-प्रेरणेशी या प्रेरणेचे साम्य आहे. ही प्रेरणा प्रत्येक मनुष्यात आढळते. तसेच अट्टाहासपूर्वक स्वतःचा ठसा

उमटविण्याकडे तिचा स्वाभाविक कल आहे. म्हणजेच ही प्रेरणा विल्-टू-पॉवर या प्रेरणेसारखीच आहे. विल्-टू-पॉवरप्रमाणेच याही प्रेरणेचे प्रत्येकातील प्रमाण सारखे नसते.

'आक्रमक प्रवृत्ती' म्हणजे 'मी करीन ते खरे' असे वागणारी प्रवृत्ती असा जरी आपणा सर्वांचा समज असला तरी अनेक वेगवेगळ्या स्वरूपात ही प्रवृत्ती आपणास दिसू शकते. कलावंत, शिक्षक, साधु, व्यापारी, रणांगणावरचा सैनिक नि सेनापती, तत्ववेत्ता आणि भिकारी सर्वांच्या ठिकाणी, आणि सर्वांच्या रूपात अशी ना तशी हीच प्रवृत्ती कार्य करीत असते. आता हीच प्रवृत्ती आपण गृहित धरलेल्या काल्पनिक समाजात कशी व्यक्त होईल ते आपण पाहू. समजा, आमचा हा काल्पनिक समाज चारी बाजूनी शत्रूपक्षियानी वेढलेला आहे, लढाई हे तेथील लोकांच्या दृष्टीने एक पवित्र कार्य आहे. तसेच एकाच प्रकारचे नैतिक शिक्षण तेथील लोकाना देण्यात येत आहे. आणि त्या शिक्षणामुळे ते लोक सर्व बाबतीत परस्परांशी अगदी एकरूप झालेले आहेत. आता अशी कल्पना करा की तेथल्या काही जणात आक्रमकपणाचे प्रमाण इतर सर्वसामान्यांपेक्षा फारच जास्त आहे. लढणे हा तेथला सर्वात महत्वाचा सद्गुण असल्याने फाजील आक्रमकपणा असणाऱ्या या लोकाना नाव काढावयास तेथे अधिक संधी मिळेल. तसेच तेथील सामाजिक दृष्टीकोनातून हे जादा आक्रमक लोक सामाजिकदृष्ट्या अधिक उपयुक्तही असतील, अशा परिस्थितीत साहसाची आवड, अविचारी धाडस, कावेबाजपणा, दांडगेपणा, अपमानाचा बदला, अपमान करणाराला शारिरीक इजा करण्याकडे प्रवृत्ती, अधिकाराची लालसा या सर्व प्रवृत्ती तेथे सर्वोत्कृष्ट सद्गुण ठरतील. सारांश, प्राणपणाने लढाई करू पाहाणारा लढवैय्या हा तेथला श्रेष्ठ आणि आदर्श मनुष्य असेल.

समजा, काही कारणाने त्या समाजात शांतता प्रस्थापित झाली. आजूबाजूला शत्रू म्हणून उरले नाही. लढाईत भाग घेण्याची वा लढाईसाठी तयार असण्याची गरज राहिली नाही. आता या नव्या स्वरूपाच्या समाजात जुन्या काळच्या लढवैय्याना काहीच भूमिका व स्थान उरणार नाही. बदललेल्या वातावरणात ते आता अनावश्यक बनतील. परंतु या लढवैय्याना तेथे काही काम असो अथवा नसो त्यांच्या अंगचा लढाऊपणा, भांडखोरपणा, आक्रमकपणा, हिंसकपणा यत्किंचितही कमी होणार नाही. परिणामत: ज्यांच्याशी भांडावे असे परके त्याना आजूबाजूस न उरल्याने आता हे लोक स्वजनांशीच भांडतील त्यांच्याशीच मारामाऱ्या करतील. त्यांची भावना सुधारलेल्या वागणाऱ्यांना गुलाम करतील. याचाच अर्थ असा की एके काळी समाजाला हितकारक ठरलेले हे लोक परिस्थिती बदलताच समाजाला अहितकारक ठरू लागतील. तसेच या लोकांकडे पाहण्याची समाजाची नैतिक धारणासुद्धा बदलेल. लढाऊपणा हा आता नव्या नीतीशास्त्रात





सद्गुण न राहाता अत्यंत वाईट प्रकारचा दुर्गुण बनेल. सारांश, जी प्रेरणा पूर्वी गौरवास्पद म्हणून नीतीवाचक होती तीच आता निंदास्पद म्हणून अनीतीवाचक ठरेल. कारण समाजाच्या धारणेला या प्रवृत्तीची आता भीती असेल. ( " भीती ही सगळ्या नैतिक आचारशास्त्रांची जननी होय. " )

समाजधारणेसाठी पूर्वी जे लोक उपयुक्त म्हणून मानपात्र ठरत होते तेच परिस्थिती पालटताच अनुपयुक्त, एवढेच नव्हे तर धोकादायक म्हणून निंद्य ठरले होते. समाज त्यांच्याकडून आता आज्ञाधारक, गरीब, सालस, अनाक्रमक सामान्य नागरीकासारख्या वर्तनाची अपेक्षा करू लागतो. अर्थात जन्मत:च जादा आक्रमक असणारे हे लोक काही झाले तरी तसे बनू शकत नाहीत. या एकूण परिस्थिती-वरून जो निष्कर्ष निघतो तो असा की कोठल्याही समाजातील असामान्य माणसांकडे तेथील जनता निर्भेळ आदराच्या व कौतुकाच्या भावनेने पाहू शकत नाही. मनुष्य असामान्य आहे म्हणजेच संभाव्य धोकादायक आहे.

आक्रमकपणाचे लढवैय्या आणि पुंड असे दोन नमुने आपण वर पाहिले. पण या प्रवृतीत एवढे दोनच नमुने मोडत नाहीत. जीवनाच्या सर्वच क्षेत्रात उदा. कला, धर्म, शास्त्रीय संशोधन, तत्वरचना, लेखन, नैतिक आचारशास्त्राची मांडणी आक्रमकपणाचे नमुने दिसतात. जें जे सामान्यापेक्षा अधिक वरच्या दर्जाचे व ठसठशीत असते तेथे नेहमीच आक्रमकपणाचे प्रमाण सर्वसाधारण प्रमाणापेक्षा अधिक असते असे गृहित धरावयास हरकत नाही.

कोठल्याही समाजातील सामान्य पण संख्येने खूप असणारी माणसे तेथीलच पण असामान्य व संख्येने कमी असणाऱ्या लोकाना मनातून घाबरून असतात. याचे कारण हे असते की असामान्य लोकात आक्रमकपणा वाजवीपेक्षा अधिक असतो आणि आक्रमकपणाचे हे गैरवाजवी प्रमाण तेथल्या सर्वसामान्य मनुष्याला कसे ना कसे जाणवत असते. म्हणून संख्येची मनापासूनची इच्छा ही असते की जे जे अपवादभूत त्या त्या सर्वांना वाकवून स्वत:सारखे मिळमिळीत बनवावे. या परिस्थितीचा उल्लेख करून नित्शे असे म्हणतात. की कळप किंवा समुदाय नेहमी लोकविलक्षणांचा ( लोकविलक्षण, अपवादात्मक लोकांचा ) द्वेष करतो. लोकविलक्षणाना घाबरतो. कळप किंवा Herd हा शब्द येथे निंदाव्यंजक अर्थाचा नाही. व्यक्ती किंवा असामान्य मनुष्य विरुद्ध कळप हा विरोध स्पष्ट करण्वासाठी, दोन प्रकारच्या स्वभावातील फरक स्पष्ट कारण्यासाठी नित्शे येथे कळप हा शब्द वापरतत. कळपाचा एकूण स्वभाव किंवा सर्वसामान्य धारणा एका विवक्षित प्रकारची असल्यास त्याच्या अगदी विरुद्ध प्रकारचा स्वभाव व धारणा जातिवंत व्यक्तीची असते असे त्याना या दोन शब्दातून सूचित करायचे आहे.

प्रत्येक राष्ट्राचे स्वत:चे ठळक आणि वैशिष्टयपूर्ण नीतीशास्त्र असते असे नित्शे म्हणतात. ग्रीकांचे ग्रीक नीतीशास्त्र. इराण्यांचे इराणी नीतीशास्त्र. ख्रिस्त्यांचे

ख्रिस्त्यांचे ' इव्हिल '—पाप, अपवित्रपण होते. परिणामतः ग्रीकाना त्यानी स्वतःशीच अपराधी वाटावयास लावले.

नित्शेच्या मते जी नैतिक दृष्टी आपण स्विकारतो त्या दृष्टीप्रमाणे आपले एकूण व्यक्तिमत्व बनतो. आपण जेव्हा ' पाप ' आणि ' पुण्याच्या ' तुलनेत जगाचा व स्वतःचा विचार करतो तेव्हा आपले व्यक्तिमत्व ज्या प्रकारचे बनते त्यापेक्षा अगदी वेगळे व्यक्तित्व आपण जेव्हा निकृष्टपण आणि उत्कृष्टपणाच्या फरकाच्या भाषेत विचार करतो तेव्हा बनत असते. एका नैतिक विचारसरणीत अपराधी भावनेचें सूतोवाच आहे. दुसरीत स्पर्धेचे आवाहन आहे. एक आपले नैतिक खच्चीकरण करू पाहाते. दुसरी आव्हान देऊन आत्मविकासाला प्रवृत करू पाहाते.

मास्टर मोरॅलिटिच्या दृष्टीतून जगात फक्त दोनच प्रकारची मनुष्ये असतात. गुड किंवा उत्कृष्ट, श्रेष्ठ. बॅड किंवा निकृष्ट, क्षुद्र. मास्टर मोरॅलिटी ' पाप ' आणि ' पुण्य ' या प्रकारचा नैतिक फरकच जगात करीत नाही. कारण नैतिकदृष्ट्या जग निर्विकार, मूल्यातीत आहे. ज्याच्या आधारे मूल्यांची उतरंड रचना येईल असे कोठलेही निश्चित तत्व जगाच्या ठिकाणी नाही. मास्टर मोरॅलिटी उत्कृष्ट आणि निकृष्ट असा नैतिक व मूल्यवाचक फरक करते. जे जिवंत व चैतन्यशील ते उत्कृष्ट. जे मिळमिळीत व निर्जिव ते निकृष्ट.

मास्टर मोरॅलिटीवाल्याना वाटते की काही झाले तरी स्लेव्ह—मोरॅलिटीवाले त्यांची बरोबरी करू शकणार नाहीत. त्यांच्यातला फरक अबाधित आहे. ज्या बाबतीत स्लेव्हज्‌पेक्षा ते श्रेष्ठ असतात त्या बाबतीत ते अबाधित अर्थाने श्रेष्ठ असतात. साहजिकच स्लेव्हज्‌ची आणि मास्टर्सची तुलनाच होऊ शकत नाही. मास्टर मोरॅलिटीच्या लोकाना उत्कृष्ट—निकृष्टपणाची भाषा कळते. त्याना पाप—पुण्याची भाषा कळत नाही. मास्टर्स हे जन्मतःच मास्टर्स असतात. एखादा माणूस मोठा असेल किंवा मोठा नसेल, क्षुद्र, क्षुल्लक असेल. मास्टर ही होता येण्याची गोष्ट नाही. ईर्षा, संकटाच्या प्रसंगीही धैर्याने पाय रोवून उभे राहाण्याची हिंमत, एकाकीपणाचे धैर्य, एकांतवासाची आवड इत्यादी जे गुण मास्टर्स नावाजतात ते एखाद्याच्या अंगी मुळात असतात किंवा नसतात. ते शिकून येत नाहीत. काही गुण मास्टर्समध्ये निरपेक्ष अर्थाने असतात. स्लेव्हजमध्ये हे गुण एकतर अजिबात नसतात किंवा असल्यास त्यांचे प्रमाण अत्यल्प असते. आपण मोठे आहोत याची जाणीव मास्टर्सना स्वभावतःच असते. त्यामुळे मारूनमुटकून स्वतःचे मोठेपण इतरांवर लादण्याची गरज त्याना भासत नाही. स्लेव्हज् जन्मतःच छोटे, क्षुद्र असल्याने अट्टाहासाने स्वतःचे मोठेपण पटवून देण्याची गरज त्याना भासते. मास्टर्स कधीही कोणाचा मत्सर करीत नाहीत. स्लेव्हज् त्यांच्यापेक्षा जे श्रेष्ठ असतात त्यांचा मत्सरल्या मनात सतत राग आणि दुस्वास करतात. मास्टर्स असणे हे जन्मावर ठरते. जन्मतःच एखादा मनुष्य मास्टर असेल किंवा

मास्टर नसेल. म्हणून मास्टर्स मूल्यमापन करताना Bad किंवा निकृष्ट ही कल्पना वापरतात. स्लेव्हज् ' पाप ' आणि ' पुण्यशीलत्वाच्या ' परिभाषेत बोलत असल्याने त्यांचे नीतीशास्त्र सल्लावाचक ( prescriptive ) असते. मास्टर्स उत्कृष्ट–निकृष्टत्वाच्या परिभाषेत बोलत असल्याने त्यांचे नीतीशास्त्र सल्लावाचक असू शकत नाही. नित्शेंच्या मते मुळात जो ' गुड ', मोठा नाही तो प्रयत्नाने गुड वा मोठा बनू शकत नाही. गुड ही स्वाभाविकपणे असण्याची अवस्था आहे. ती प्रयत्न-साध्य अवस्था नाही. ' गुड ' हा नेहमीच स्वाभाविक ॲरिस्टोक्रॅट असेल.

जातिवंत ॲरिस्टोक्रॅट समाजाच्या उपयोगी पडू शकतो. पण स्वतःकडे तो उपयोगांच्या दृष्टीकोनातून कधीही पाहू शकत नाही. तो उपकार करण्यासाठी, किंवा उपकार करताना स्वतःचा मोठेपणा सिद्ध होतो म्हणून उपकार करीत नाही. तर कोणासाठी काही चांगले करता येत आहे व चांगले करता येण्याचे सामर्थ्य आपणापाशी आहे एवढ्याच फक्त कारणासाठी तो ते करतो. लोकाना देण्याची आपली शक्ती आहे म्हणून तो जे देतो ते देतो. लोकाना उपकृत करून आपले ऋणी करून ठेवावेत म्हणून नव्हे. उलट आपण देणार आहोत ते घेण्यासाठी कोणी याचक आपणाला मिळाला याच्यासाठी ते याचकाचेच ऋणी असतात. मास्टर्स स्वतःसाठी स्वतःला मान देतात. स्वतःच्या सार्वजनिक उपयोगासाठी नव्हे.

मास्टर्सच्या दृष्टीने जे त्याच्यासारखे नसनात ते निकृष्ट असतात. निकृष्ट हा मूल्यवाचक शब्द असला तरी नैतिक शब्द नाही. अंड्यांचा विचार करताना काही अंड्याना आपण उत्कृष्ट म्हणतो काहीना निकृष्ट म्हणतो. यात अंड्यांचा दोष असत नाही. अंडी तशी असतात एवढेच खरे. माणसांचेही तसेच. माणसे उत्कृष्ट असतात किंवा निकृष्ट असतात. त्यात गुणदोष कोणाचाही नाही.

ज्या गुणधर्मांना मास्टर्स सद्‌गुण म्हणतात त्यानाच स्लेव्हज् दुर्गुण म्हणतात. स्लेव्हज्‌च्या दृष्टीने आंधळे, पांगळे, लंगडे, थोडक्यात poor in spirit लीन ' गुड ' होत. याच्या उलट उद्दाम, करारी, थोडक्यात मास्टर्स ' इव्हिल ' पापी होत. स्लेव्हज्‌ना वाटते की मास्टर्सनीसुद्धा त्यांच्यासारखेच लीन व नम्र असावे. समजदार, शहाणे बनावे. स्लेव्हज्‌चे नीतीशास्त्र सल्लावाचक असते.

**अर्थात** स्लेव्हजची ही भाषा मास्टर्संना कळत नाही. कारण मास्टर्स उत्कृष्ट–निकृष्ट या फरकात विचार करतात. निकृष्ट हे जन्मतःच निकृष्ट आहेत असे ते मानतात. तीच गोष्ट उत्कृष्टाची. उत्कृष्टसुद्धा जन्मतःच उत्कृष्ट असतो. म्हणून त्यांच्या दृष्टीने येथे सुधारणा संभवत नाही. स्लेव्हज पाप आणि पुण्याच्या भाषेत बोलतात. पाप्याचा पुण्यवान होऊ शकतो. मास्टर्सच्या बाबतीत पाप आणि पुण्य याचा संबंधच येत नाही. ते Bad नसतात. ते ' इव्हिल ' असतात. म्हणजे आक्रमक असतात. ' आक्रमक ' मास्टर्संना Bad किंवा निरुपद्रवी, अनाक्रमक, स्वभावाने गरीब, लीन बनता येणे शक्य नसते.

एव्हाना नित्शेची सर्वसाधारण नैतिक व मानसशास्त्रीय बैठक आपल्या ध्यानात आली असेल. नित्शेच्या दृष्टीने माणसाचे सामर्थ्य त्याच्या पॅशन्स किंवा ड्राइव्हजमध्ये आहे. त्याच्या विवेकात वा विचारशक्तीत नाही. माणसाला बदलायचे असेल तर त्याच्या पॅशन्स सुरक्षित ठेवून बदलण्याचा प्रयत्न करावयास हवा. पॅशन्स खच्ची करणे म्हणजे माणूसच खच्ची करणे. पॅशन्सवर बाह्य सामाजिक वा नैतिक वातावरणाचा काहीही परिणाम होत नाही. मात्र पॅशन्सच्या आविष्कारावर हा परिणाम जरूर होतो. पॅशन्स आपण कोंडून धरू शकतो. त्याना मुक्त वाट देऊ शकतो, वगैरे. परंतु काही झाले तरी पॅशन्सचे निर्मूलन करता येणे शक्य नसते. पॅशन्सला वेगळे वळण देता येते. तिचा प्रवाह बदलता येतो. दिशा बदलता येते. उदा. आक्रमक-प्रवृत्ती आपण संशोधनकार्याकडे वळवू किंवा लष्करात जेथे प्रत्यक्ष लढण्याचे काम चालते तेथे लावू. महत्वाची गोष्ट ही की पॅशन्स आपण जरी कोठल्याही कार्याला जुंपल्या तरी त्यांची मूळ शक्ती कायमच राहाते. त्या शक्तीच्या प्रमाणात काहीच बदल घडत नाही.

प्रेरणा अजिबात नष्ट होऊ शकत नाहीत याचे कारण असे की प्रेरणा केवळ ऊर्जास्वरूपी आहेत. त्या जड वस्तूसारख्या ( एंटिटीसारख्या ) जड वस्तू नाहीत. प्रेरणा म्हणजे प्रेरणांचे बाह्य कार्यात जे उत्सर्जन घडून येते ते उत्सर्जन. (डिस्चार्ज). प्रेरणा (ड्राइव्हज) हे करतात आणि प्रेरणा ते करतात अशा प्रकारचे कर्ता व त्या कर्याची कृती सूचित करणारे शब्द आपण वापरतो. पण तो केवळ भाषेचा उपचार होय. आपली भाषा उद्देश्य आणि विधेयाच्या तंत्रात कार्य करीत असल्याने प्रत्येक कृतीला ती कृती करणारा स्वतंत्र आणि वेगळा कर्ता अस्तित्वात असलाच पाहिजे असे आपणास वाटते व हा कर्ता समोर दिसला नाही तरी तो आहे असे आपण गृहित धरतो. प्रेरणा व प्रेरणेचे बाह्य उत्सर्जन या वेगवेगळ्या गोष्टी नाहीत. प्रेरणा म्हणजेच प्रेरणेचे उत्सर्जन. म्हणून एखादी प्रेरणा जेव्हा आतल्या आत दाबून टाकण्याचा प्रयत्न आपण करतो तेव्हा तिचा बाह्य उद्रेक आपणाला दिसला वा जाणवला नाही तरी ती दुसऱ्या कोठल्या तरी स्वरूपात बाहेर येतच असते. उदा. आक्रमक प्रवृत्तीला आपण बाहेर पडू दिली नाही तरी ती प्रवृत्ती स्वतःच्या मालकाविरुद्धच उलटेल. तो उदासीन बनेल. चिरचिरा बनेल, वगैरे.

आपणाला एंटिटी आणि त्या एंटिटीचे कार्य या प्रकारच्या बौद्धिक चौकटींची सवय आहे. नित्शे अगदी वेगळ्या प्रकारच्या बौद्धिक चौकटीत स्वतःचे विचार मांडू पाहतात. एंटिटी आणि त्या एंटिटींचे परिणाम या चौकटीऐवजी पॉवर किंवा ऊर्जेचे वळणे वा स्थित्यंतरांची कल्पना वापरून नित्शे आपले विचार मांडतात. वस्तू हे स्थिर तत्व असते. समजा, ते स्थिर नसले तरी ते स्थिर आहे असे आपण गृहित धरतो. त्यामुळे वस्तूच्या परिणामांचा कार्यकारणभावात्मक विचार मांडणे आपणाला नेहमी सुलभ असते. पॉवर हे गत्यात्मक तत्व आहे. पॉवर

म्हणजेच पॉवरचे बाहेर जे दृश्य परिणाम आपणास जाणवतात ते दृश्य परिणाम होत. हे परिणाम पॉवरपासून आपण अलग करू शकत नाही. ही पॉवर आणि हे, हे, हे त्या पॉवरचे परिणाम अशा प्रकारची भाषा आपण पॉवरच्या संबंधात वापरू शकत नाही. वस्तूंच्या संबंधात अशा प्रकारची भाषा आपण वापरू शकतो. पॉवर मध्यवर्ती मानून ज्या प्रकारची मीमांसा नित्शे मांडू पाहातात ती मीमांसाही गत्यात्मक असते. काही केले तरी ती कार्य-कारणाच्या चौकटीत वळविता येत नाही. नित्शेंच्या मीमांसेचा (जगासंबंधीच्या विचाराचा-मेटॅफिजिक्सचा) प्रकार आपणास सर्वस्वी अपरिचित आहे.

नित्शे म्हणतात की जग वस्तूंचे-कारणांचे बनलेले नाही. ते स्पंदनांचे-पल्सेशन्सचे बनलेले आहे. पॉवर-स्पंदनांचे बनलेले आहे. मात्र येथे स्पंदने असली तरी त्या स्पंदनाना जन्म देणारे वेगळे कारण येथे अस्तित्वात आहे असे त्याना म्हणायचे नाही. जग स्पंदनांचे बनलेले आहे असे म्हणताना त्याना असे सांगायचे आहे की ही स्पंदने म्हणजेच विश्व होय. कारण वेगळे आणि त्या कारणाची स्पंदने वेगळी असे जर आपण म्हणालो तर ही स्पंदने घडतील अथवा घडणार नाहीत. स्पंदने निर्माण होतील. किंवा नाही हे शेवटी तेथे स्पंदनांच्या कारणावर-त्या विशिष्ट वस्तूवर अवलंबून असेल. नित्शेंची भूमिका यापेक्षा अजिबात वेगळी आहे. ते स्पंदनानाच विश्वाची रचना समजतात. विल्-टू-पॉवर स्पंदने. ही स्पंदने अखंडीतपणे सुरू असतात. आणि त्याचाच परिणाम म्हणून वेगवेगळ्या वळणांच्या, अन्वेषणांच्या रूपातले जग तयार होते. हे अर्थात आपल्या नेहमीच्या कर्ता-क्रियापदात्मक भाषेत मांडता येणे शक्य नाही. समजा, नामे आणि त्या नामांशी संबंधित विशेषणे वगळून फक्त क्रियापदे व क्रियाविशेषणांवर आधारित जर एखादी नवी भाषा आपण तयार करू शकलो तर ही स्पंदनांची तत्वमीमांसा आपण बरोबर मांडू शकू. ("जगात फॅक्टस वा थिंग्ज नाहीत, जगात फक्त स्पंदने-पल्सेशन्स, असतात.") कर्ता व त्या कर्त्याच्या कृती ( म्हणजे वस्तू घटिते किंवा कारणे व त्या कारणांचे कार्य )गृहित धरून ज्या नैतिक कल्पना आपण मांडतो त्या नैतिक कल्पना अर्थातच स्पंदनांच्या विचारसरणीच्या तुलनेत विपर्यस्त ठरतात. कारण ज्याला कर्ता व कारण म्हणावे असे काहीच प्रत्यक्षात नसताना तसे खरोखर आहे असे मानून तयार केलेले नैतिक मूल्यांकन वस्तुस्थितीचे विपर्यस्तीकरण असते असे नित्शेना वाटते.

हे संपूर्ण विश्व आणि त्यात जे जे काही आहे ते सर्व म्हणजे विल्-टू-पॉवरचे स्पंदन होय. अर्थातच प्रत्येक पृथक आकार ह्यादेखिल त्याच मूलभूत विल्-टू-पॉवरचा आकार असेल. आणि विल्चा आकार म्हणून शक्तीचा आकार असेल. दुसऱ्या शब्दात हेच सांगायचे तर असे म्हणता येईल की जगातला प्रत्येक पृथक् आकार हे एकएक शक्तीकेंद्र आहे. या शक्तीकेंद्राची शक्ती त्या शक्तीकेंद्रात मूलतः प्रवर्तित झालेल्या विल्-टू-पॉवरच्या प्राथमिक प्रमाणाएवढी असेल. कोणा

शक्तीकेंद्राचे असे मूळ प्रमाण अधिक असेल; कोणाचे कमी असेल. मनुष्यदेखिल त्याच विल्-टू-पॉवरचा बनला असल्याने त्यालासुद्धा वरचाच नियम लागू आहे. माणसी असे की आताच आपण वर पाहिले त्याप्रमाणे मनुष्याच्या ठिकाणी विल्-टू-पॉवर हे त्याच्या प्रेरणा असतात. या प्रेरणा कधी प्रबल असतात तर कधी दुर्बल असतात. ज्याच्या प्रेरणा प्रबल असतात, तो मनुष्यही प्रबल असेल. उलटपक्षी प्रेरणा दुर्बल असणारा मनुष्यही दुर्बल असेल. येथे अर्थात नैतिक श्रेष्ठत्व वा कनिष्ठत्वाचा प्रश्न उपस्थित होत नाही. आपण फक्त प्रेरणांच्या व शेवटी मनुष्याच्या एकूण धारणांच्या प्राबल्य-दौर्बल्याचा विचार करीत आहोत.

मनुष्य म्हणजे मनुष्याच्या प्रेरणा आणि प्रेरणा म्हणजेच प्रेरणांचा बाह्य उद्रेक. तेव्हा अंतिम विश्लेषणात मनुष्य म्हणजे मनुष्याचे बाह्य वागणे होय. प्रबळ प्रबळाप्रमाणे वागेल. दुर्बल दुर्बलासारखा वागेल, या तत्त्वाप्रमाणे विचार केल्यास सिंह जर कोकराप्रमाणे वागला तर सिंहाला कोकरूच म्हणावे लागेल. कारण कोकरू म्हणजे कोकरू ज्या प्रकारचे वर्तन करते ते वर्तन होय. हे वर्तन कोकरासारखे असल्याने कोकराला आपण कोकरू म्हणतो. बाह्य वागणे किंवा जे काही केले जाते ते म्हणजे संपूर्ण वास्तवता होय असे नित्शे मानतात. तुमचे थोर विचार नव्हेत तर तुमच्या वागण्यावरून तुमची किंमत ठरते असे त्यांना वाटते.

मनुष्य म्हणजे मनुष्य ज्या प्रकारचे वर्तन करतो ते वर्तन होय. आता सबल मनुष्य सबलासारखा वागेल व दुर्बल दुर्बलासारखा असे हा प्रबंध सांगतो. सबळ ( स्ट्रांग ) दुर्बलपणाचे वर्तन करीलच कसा असा प्रश्न नित्शे विचारतात. अर्थात सामर्थ्य नेहमी शारिरीक शक्तीच्या प्रमाणात मोजण्याची गरज नाही. तलवार-बहाद्दूर हाच काही सामर्थ्याचा आदर्श नव्हे ! सामर्थ्याचे अनेक प्रकार आहेत. स्वतःला त्रास करून घेऊन स्वतःच्या शरीरावर व मनावर विलक्षण ताबा आणू पाहाणारा तपस्वी हादेखिल सामर्थ्याचाच नमुना होय.

शक्ती शक्तीच्या स्वभावाप्रमाणेच वागू शकते. शक्ती स्वतःच्या स्वभावाच्या विरुद्ध वर्तन करू शकत नाही. या शक्तीला जर प्रगटण्यासाठी वाव मिळाला नाही तर ती स्वतःच स्वतःला त्रास करून घेईल. काही झाले तरी ती स्वस्थ बसू शकणार नाही.

संपूर्ण विश्व हेच शक्तीची स्पंदने असल्याने मानवी जग हे मानवदेहधारी पृथक इच्छाशक्तींच्या शक्तिमापनाचे क्षेत्र ठरते. येथे प्रत्येक विल् दुसऱ्या विल्बरोबर लढत देऊन स्वतःची शक्ती अजमावून पाहात असतो. इच्छाशक्तींची आपापसातली लढत हाच येथला कायदा असल्याने दुःख हेच या जगाचे स्वरूप आहे. एकतर आम्ही तरी इतरांच्या इच्छाशक्तीवर वर्चस्व गाजविण्याच्या प्रयत्नात असतो किंवा इतर तरी आमच्या इच्छाशक्तीवर वर्चस्व गाजविण्याच्या प्रयत्नात असतात. आणि शेवटी सर्व मिळून अ-मानवी जड व अजड वास्तवावर

वर्चस्व गाजविण्याच्या प्रयत्नात असतात. सारांश, एकतर आमच्यामुळे इतर दुःखी असतात किंवा इतरांच्यामुळे आम्ही दुःखी असतो. दुःख ही या जगाची स्वाभाविक प्रकृती आहे. आम्ही इतरांवर परिणाम घडवून आणू किंवा इतर आमच्यावर परिणाम घडवून आणतील. मानवी आयुष्याला जेव्हा काही आकार देण्याचा प्रयत्न होतो म्हणजेच स्वैराचाराच्या किंवा बेशिस्तीच्या ठिकाणी शिस्त आणली जाते तेव्हा तेव्हा दुःख देऊनच ते घडविले जाते. डागण्या देऊन, परत परत शिक्षा लावून माणसाच्या रानटी कळपाचे रूपांतर माणसाच्या समंजस व शहाण्या समाजात घडून येते. दुःख, शिक्षा, यातना हे एक सामाजिक हत्यार आहे.

जीवनात दुःख अटळ आहे. दुःख नि यातनांची किंमत दिल्यावाचून या जगात काहीही श्रेष्ठ असे निर्माण झालेले नाही. निर्माण होऊ शकत नाही. केवळ फक्त ऊर्जेतून नव्हे तर ऊर्जा आणि तिला दिला जाणारा सुबक आकार या दोहोंच्या एकत्रिकरणातून जे जे उत्तम ते निर्माण झाले आहे. आणि आकार देणे म्हणजे अमर्यादाला मर्यादा घालणे, अनिर्बंधावर बंधन लादणे; थोडक्यात दुःख देणे होय.

माणूस म्हणजे माणसाच्या प्रेरणा. दडपून या प्रेरणा नष्ट होत नाहीत. उलट त्यांचे विकृतिकरण घडते. आपली आक्रमक प्रवृत्ती घ्या. या प्रवृत्तीचा सर्वसाधारण रोख स्वतःबाहेर असतो. परंतु काही कारणाने त्यात व्यत्यय आला, त्याला अडथळा करण्यात आला तर तो रोख स्वतःच्या विरुद्ध वळतो. अशा वेळी तो मनुष्य स्वतःचाच तिटकारा करू लागतो. द्वेष करू लागतो.

विल्–टू–पॉवरचे एकूण परिणाम विचारात घेतल्यास असे म्हणता येईल की विल्–टू–पॉवर हे प्रत्यक्षात विल्–टू–ओव्हरकम, विरोधाचा पाडाव करून विरोधावर मात करणारे तत्व आहे. विल्–टू–पॉवर म्हणजे विल्–टू–ओव्हरकम. पाडावाची. इच्छा करणे, स्वाधीन करू पाहाणे, स्वतःच्या अंमलाखाली आणू पाहाणे, स्वतःचा ताबा मिळवू पाहाणे, वगैरे. परिणाम विचारात घेता ही एक ईर्षा आहे असे म्हणता येईल. ही ईर्षा जितकी इतरांच्या–इतर मनुष्यांच्या, इतर विषयांच्या विरुद्ध वापरली जाऊ शकते तितकीच ती स्वतःच्याही बाबतीत वापरली जाऊ शकते. जेव्हा कोणी ती स्वतःच्या बाबतीत वापरतो तेव्हा आपण त्याला आत्मदमन, आत्मविजय असे शब्द वापरतो.

नैतिक कायद्याचे मानवी जीवनातले महत्व हे आहे की या कायद्यानी स्वतःच स्वतःवर अंमल कसा चालवावा याचे शिक्षण मनुष्याला दिले व तसे करून आणि स्वतःच्या अनिर्बंध प्रेरणांवर सत्ता चालववयास शिकवून रानटी मनुष्याचे रूपांतर त्यानी सुसंस्कृत मनुष्यात घडवून आणले. पशूचा माणूस बनविला. 'आपण स्वतःच स्वतःवर सत्ता चालवू शकतो ही शक्यता ज्या क्षणी मनुष्याला जाणवली त्या क्षणी मनुष्याच्या मनात स्वतःच्या भवितव्यासंबंधी एक नवी आशाही अंकुरली. एक नवा विश्वास पैदा झाला. नाही, माणूस हा माणसाच्या बाबतीतला अंतिम





शब्द नाही. माणूस हा माणसाला त्याच्या स्वतःच्या पलिकडे घेऊन जाणारा एक पूल आहे. माणूसपणाकडच्या प्रवासाचा तो शेवटचा टप्पा नाही. माणूस हा माणसाने स्वतःच स्वतःला दिलेला शब्द होय." ( झरथुष्ट्र )

मनुष्याच्या एकूण भागधेयासंबंधिचे झरथुष्ट्राचे आणि नित्शेंचे व्हिजन एकच आहे. माणूस हा माणूसपणाच्या वाटेवरचा शेवटचा शब्द नाही. मनुष्याला अजून खूप लांबचा पल्ला गाठायचा आहे. गाठता येणार आहे. आहे. पूर्वी कधी काळी मनुष्य हा दोन पायांचा केवळ एक पशू होता. पण त्याने स्वतःसाठी, स्वतःच्या आयुष्याला मार्गदर्शन देण्यासाठी नैतिक कायदे तयार केले. हे नैतिक कायदे पाळता पाळता तो पशू आज माणूस झाला. तेव्हा ज्या पद्धतीने मनुष्याने स्वतःला पशुत्वातून बाहेर काढून मनुष्यत्वात परिणत केले त्याच पद्धतीने तो स्वतःला मनुष्यत्वातून बाहेर काढून अतिमनुष्यत्वात परिणत करू शकेल. पशुत्वातून बाहेर येण्यासाठी कडक सार्वजनिक कायद्यांची गरज त्याला पडली. मनुष्यत्वातून बाहेर येण्यासाठी व अतिमनुष्यत्वाला पोचण्यासाठी तितक्याच कडक वैयक्तिक कायद्यांची गरज लागेल. सारांश, नित्शे मनुष्याला परत पाठीमागे पशुत्वाकडे नेऊ इच्छित नाहीत. ते त्याला मनुष्यत्वाच्याही पलीकडे अतिमनुष्यत्वाकडे घेऊन जाऊ इच्छितात. ते म्हणतात की आजचा माणूस हा कालचा पशू होता पण तोच उद्याचा अतिमानव असू शकतो. एकदा मनुष्याने पशुत्व मागे टाकले. आता त्याला मनुष्यत्व मागे टाकून अतिमनुष्यत्व, महामानवत्व प्राप्त करून घ्यायचें आहे. नित्शे सद्यस्थितीच्या पुढे जाऊ इच्छितात मागे नव्हे. या गोष्टीचा विसर होऊ देता कामा नये.

महामानवत्व विल्–टू–पॉवरच्या सुबुद्ध राबविण्यातून सिद्ध होणार असते. सामान्यतः विल्–टू–पॉवरचा वापर मनुष्य इतरांच्या (इतर मनुष्ये, इतर जड वस्तू वगैरेंच्या) विरुद्ध करतो. नित्शेंचे म्हणणे विल्–टू–पॉवर आपण स्वतःच स्वतःविरुद्ध राबवावयास हवे. शरीर आणि मन मारून स्वतःच्या इच्छाशक्तीला धार आणू पाहाणारा तपस्वी हे या प्रकारच्या राबवण्याचे एक उदाहरण आहे. फारसे श्रेयस्कर नव्हे पण अगदी टाकाऊही नव्हे. किंबहुना ज्या अनेक प्रकारे मनुष्ये स्वतःच्या विल्–टू–पॉवरची शक्ती मोफत घालवितात त्याच्याशी तुलना करता एका अर्थी तपस्याचा जीवनमार्ग स्पृहणीयच म्हणता येईल.

इच्छाशक्ती वापरून मनुष्याने स्वतःच्या व्यक्तित्वाला व आयुष्याला आकार दिला पाहिजे असे आपण म्हटले. पण आकार हा शब्द गोंधळात टाकणारा आहे. आकार किंवा फॉर्म या शब्दाला एकूण तीन ठळक अर्थ आहेत. त्यातील फक्त एकच अर्थ आपणाला येथे अभिप्रेत आहे. आकार म्हणजे आपल्या डोळ्याला दिसतो तो बाहेरच्या दिसण्याच्या स्वरूपातला आकार. हा दृष्टीवाचक अर्थाचा आकार होय. दुसरा रचनेच्या स्वरूपातला आकार–आकाराचे निरनिराळे घटकावयव, त्या घटकावयवांचा एकमेकांबरोबरचा प्रमाणबद्ध संबंध, तसेच त्या संपूर्ण

रचनेबरोबरचाही त्या घटकावयवांचा तसलाच प्रमाणबद्ध संबंध हे सर्व मिळून जे काही असते ते म्हणजे हा रचनावाचक आकार होय. आकार या शब्दाचा तिसरा अर्थ प्रतिरूपात्मक आकार हा होय. आकार म्हणजे अशा अशा प्रकारचे मानसिक चित्र. एक कल्पना. नित्शे या तिसऱ्या अर्थाने आकार हा शब्द येथे वापरतात.

आजवर मनुष्य परमेश्वराची भक्ती करीत होता. मनुष्यातले जे जे उदात्त ते ते जमेस धरून मनुष्याने परमेश्वराची एक कल्पना स्वतःच्या मनाशी तयार केली होती व त्या मनोरचित कल्पनेला तो भजत होता. नित्शेंचे म्हणणे असे की आज परमेश्वराचा अंत झाला आहे. मनुष्याच्या दृष्टीने परमेश्वरप्राप्तीचे ध्येय खरे राहिले नाही. अशा परिस्थितीत हे ध्येय टाकून देऊन दुसरे ध्येय त्याने स्वतःसाठी रचले पाहिजे. दुसरी गोष्ट अशी. परमेश्वरप्राप्तीच्या ध्येयात मनुष्य सदोदित केवळ एक पराधिन प्राणीच राहिला. परमेश्वरावर अवलंबून असणारा प्राणी. परमेश्वर पिता, आम्ही बालक; परमेश्वर स्वामी आम्ही सेवक, वगैरे. या संबंधात मनुष्याकडे सदोदित केवळ दुय्यम भूमिका होती व या दुय्यम भूमिके-मुळे स्वतः प्रौढ होण्याचा प्रयत्नही मनुष्याने कधी केला नाही. स्वतःच्या सगळ्या बऱ्यावाईट कृत्यांची व दैवाची जबाबदारी परमेश्वराच्या खांद्यावर टाकून स्वतः नामानिराळा राहावयास त्यामुळे मनुष्य शिकला. तो कधी प्रौढ झालाच नाही. नित्शे म्हणतात की पिता–पुत्र, स्वामी-सेवक संबंध संपुष्टात आल्यावाचून व मनुष्य पूर्णपणे स्वाधिन, स्वतंत्र बनल्यावाचून त्याचे आयुष्य सफल झाले असे म्हणता येणार नाही. ते सफल होण्यासाठी त्याचे नीतीशास्त्र सुद्धा बदलून टाकवे लागेल. आजवरची सगळी नीतीशास्त्रे पाप-पुण्याच्या संदर्भात वर्तन करतात. मनुष्ये जेव्हा पाप-पुण्याच्या संदर्भात वर्तन करतात तेव्हा ती भीतीग्रस्त बनतात. अपराध-गंडाने पछाडली जातात. त्यांची मानसिक वाढ योग्य प्रकारे होत नाही. म्हणून पाप-पुण्यवाचक नीतीकल्पनांवर आधारित नीतीशास्त्र बदलून उत्कृष्ट–निकृष्ट-वाचक नीतीकल्पनांवर आधारित नीतीशास्त्र वापरले तर आजवरच्या मनुष्यापेक्षा वेगळ्या प्रकारचा मनुष्य निर्माण होऊ शकेल असे नित्शेना वाटते.

नित्शेना नीतीशास्त्र पापपुण्याच्या व अपराधीपणाच्या कल्पनेवर बेतले जावयास नको आहे. त्याऐवजी स्वतःविषयीच्या सार्थ अभिमानाच्या कल्पनेवर असे नीतीशास्त्र मनुष्याने तयार करावे असे त्याना वाटते. स्वतःविषयीच्या सार्थ अभिमानाची दुसरी बाजू म्हणजे स्वतःच्या हातून अपकृत्य घडल्यास त्याबद्दल वाटणारी शरम व असे अपकृत्य घडू नये यासाठी ठेवली जाणारी जागरूकता. नित्शेंचा भर या तीन गोष्टींवर आहे. नित्शे म्हणतात की मनुष्याने स्वतःच्या "सावलीच्या मानालाही जपले पाहिजे." ख्रिस्ती संस्कृती अपराधी-पणाच्या कल्पनेवर अधिष्ठीत आहे. नित्शे त्याऐवजी आत्मलज्जेची कल्पना लोकप्रिय करू पाहातात.

विल्–टू–पॉवरच्या साहाय्याने मनुष्य बाहेरचे जग काबीज करू शकतो. किंवा तीच शक्ती वापरून स्वतःला काबीज करू शकतो. यालाच नित्शे सेल्फ–ओव्हरकमिंग–स्वतःलाच मागे टाकून अधिक वर जाणे, आत्मविजय संपादन करणे म्हणतात. परमेश्वराच्या प्राप्तीसाठी स्वतःचे शरीर व मन मारणारा तपस्वी हे या प्रकारच्या सेल्फओव्हरकमिंगचे एक उदाहरण. धार्मिक व नैतिक शिकवणुका मनुष्यापुढे तपस्व्याचा आदर्श ठेवतांत व मनुष्य स्वतःच्या आयुष्याला तसा घाट देऊ पाहतो. म्हणजे आत्मदमन हे आयुष्याला घाट देण्याचे एक साधन आहे. परंतु तपस्व्याच्या आयुष्याकडे पाहिले की असे दिसते की आत्मदमन हे येथे साधन राहिले नसून त्या साधनाने साध्याची जागा घेतली आहे. धर्म आणि नैतिक शिकवणूकांनी मनुष्याचे स्वतःबद्दलचे मत असे काही कलुषित केले आहे की मनुष्य आत्मदमनालाच सर्वश्रेष्ठ आयुष्य मानू लागला आहे. धार्मिक व नैतिक शिकवणुकांच्या नावाखाली स्वतःच्या शारिरीक प्रेरणा दडपून टाकण्याच्या बाबतीत मनुष्य इतका पराकोटीला पोचल्याचे दिसते की या प्रकारात त्याचे सगळे व्यक्तिमत्वच रोगट व खुजे बनून गेले आहे. आत्मदमन हे साधन आहे. व्यक्तित्वाला आवश्यक ते वळण देण्याचे साधन. आत्मदमन हे साध्य नव्हे साध्य उत्तुंग व्यक्तित्व. समतोल व्यक्तित्व.

आत्मदमन म्हणजे आत्म-आक्रमण. ( सेल्फ–अॅग्रेशन. ) स्वतःच स्वतःला मोडून काढणे. आत्मदमन करू पाहाणारा मनुष्य स्वतःचे विल्–टू–पॉवर स्वतःच्याच विरुद्ध वापरू पाहातो. व तसे करून स्वतःच्या प्रेरणांमध्ये काही एक प्रकारची स्वयंशिस्त आणू पाहातो. आत्मदमन हे अशा प्रकारे मनुष्यातल्या पशुत्वाचा बंदोबस्त करण्याचे एक सामर्थ्यवान शस्त्र, औषध आहे. पण तपस्व्याच्या बाबतीत ते औषध न उरता त्याचे रूपांतर पूर्वीपेक्षाही भयंकर रोगात घडून येते. कारण आता आत्मदमन हीच स्वतःच एक प्रतिष्ठेची बाब बनते. मनुष्ये आत्मदमनाच्या मोठेपणासाठी आत्मदमन करू लागतात. आत्मदमन करता करता मनुष्ये शेवटी स्वतःच्या शरीराचा, स्वतःच्या आयुष्याचाच द्वेष करू लागतात. आणि द्वेषाच्याच टप्प्यावर स्थगित होऊन राहातात.

स्वतःचा द्वेष करण्याच्या या मानसिक अवस्थेला नित्शे Bad Consciousness म्हणतात. किंवा जाणीवेची दोषास्पदता म्हणतात. मनुष्याची धार्मिक जाणीव ही अशा प्रकारे दोषास्पद अपजाणीव असते असे त्यांचे मत आहे. धर्म स्वाभाविकपणेच निसर्गविरुद्ध, नैसर्गिक प्रेरणा दडपू पाहाणारा असतो. आणि हे तो परलोकप्राप्तीच्या ध्यासासाठी करतो. धर्माचे सारे लक्ष पारलौकिकावर, परलोक साधनावर असल्याने जे जे ऐहिक, पार्थिव त्या त्या सर्वांचा धर्माला तिटकारा असतो. मरणानंतर स्वर्गाची अथवा मोक्षप्राप्तीची काल्पनिक चित्रे रंगवून धर्म मनुष्याला ऐहिकाचा व स्वतःच्या शरीराचा द्वेष शिकवितात. मनुष्य मग

स्वतःच्या स्वाभाविक प्रेरणांचाच द्वेष करू लागतो. कोणाच्याही मानसिक आरोग्याच्या दृष्टीने पाहाता ही परिस्थिती अत्यंत अयोग्य आहे. धर्म मनुष्याची आत्मजाणीव विकृत प्रकारे वाकवितात व तसे करून त्याच्या संपूर्ण आयुष्याचाच नाश करतात. धर्म मनुष्याची फसवणूक करतात, त्याला बनवितात, त्याचे नुकसान करतात.

पॅशन्स आमूलाग्र नष्ट करता येत नाहीत. पॅशन्स नष्ट होत नाहीत. तसे करण्यांचा प्रयत्न केला तर त्या विकृत वळण घेतात. पॅशन्स ताब्यात ठेवता येतात. त्यांची दिशा पालटता येते. त्याना हितकारक वळण देता येते. तसेच मनुष्याची शक्ती त्याच्या पॅशन्सच्या शक्तीवर अवलंबून असते. जितक्या पॅशन्स शक्तीमान तितका तो मनुष्य शक्तीमान हा नित्शेंचा मूलभूत प्रबंध आहे. अर्थात केवळ पॅशन्स बलवान आहेत म्हणून तो मनुष्यही श्रेष्ठ आहे असे नित्शे कोठेही म्हणत नाहीत. पॅशन्शसाठी पॅशन्सना नित्शेंच्या दृष्टीने महत्व नाही. शिस्तबद्ध पॅशन्सना त्यांच्या विचारसरणीत महत्व आहे. पॅशन्सना घाट, वळण दिले गेले पाहिजे असे ते सांगतात. आणि त्यासाठी अतिमानवाच्या आदर्शाची कल्पना मांडतात. पॅशन्स म्हणजे विल्–टू–पॉवर. पण अफाट, अनियंत्रित पॅशन्स म्हणजे अफाट सामर्थ्य नव्हे. आत्मनियंत्रित पॅशन्स म्हणजे खरे सामर्थ्य. (डायोनिसस अधिक अपोलो–अपोलोच्या नियंत्रणाखालचा डायोनिसस.) विल्–टू–पॉवरला विल्–टू–पॉवरसाठी महत्व नाही. विल्–टू–पॉवरवर विल्–टू–पॉवरचा अंमल असणारे विल्–टू–पॉवर महत्वाचे. पराकोटीचे इंद्रियदमन करणारा तपस्वी हा या प्रकारचा एक नमुना. पण तपस्वी आयुष्य अधिक उदात्त, उच्च प्रतीचे व्हावे म्हणून हे आत्मदमन करीत नाही. उलट जीवनाचा अधिक्षेप म्हणून तो हे आत्मदमन करतो. कारण ज्या जीवनाचा तो स्वतःही एक आविष्कार आहे त्या जीवनालाच आत्मदमन करून तो नाकारू पाहातो. विल्–टू–पॉवर ताब्यात घेण्याच्या दृष्टीने तपस्वी हा जरी मानवी आयुष्याचा एक उत्तम मार्ग असला तरी आदर्श मानवी आयुष्य म्हणून तपस्व्याचा नमुना आदर्श नाही. आत्मविजय ही गोष्ट महत्वाची खरी. परंतु आत्मविजय जीवनाच्या सेवेसाठी हवा. जीवनाच्या निर्मूलनासाठी, किंवा जीवनाच्या विनाशासाठी नको. स्वतःच्या पॅशन्सना मनुष्याने असे वळण द्यावयास हवे की त्यामुळे मनुष्याच्या मनुष्यत्वाचाच उद्धार घडून येईल; मनुष्याचे मनुष्यत्व कांकणभर का होईना पण आतापेक्षा पुढे सरकेल.

मनुष्याच्या आत्मोद्धारासाठी आत्मदमन अत्यंत आवश्यक आहे. मनुष्य एकाच वेळी सेल्फ–ओव्हरगोईंगही आहे आणि सेल्फ–अंडरगोईंगही आहे. स्वतःच्या अनिर्बंध पॅशन्सच्या पलिकडेही जाणार असतो आणि त्याच पॅशन्स स्वतःच्या आत खालीही ढकलून देणार असतो. स्वतःला वळण लावताना, स्वतःच्या इच्छाशक्तीचा अंमल स्वतःवर चालविताना स्वतःच्या अनिर्बंध प्रेरणांवर जणू मनुष्य स्वार

होतो. मनुष्याच्या आयुष्यात अशा प्रकारे वर जाण्याला आणि खाली जाण्याला सारखेच महत्व आहे. अधिक वरच्या अवस्थेप्रत जाण्यासाठी केवळ मनुष्यत्वाच्या पलिकडे जावे लागते आणि असे पलिकडे जाताना अनेक गोष्टी मनुष्य मागे टाकतो. हा एक यज्ञ आहे. या यज्ञाचा होताही तोच आणि यज्ञात देवताना वाहयाच्या हविर्भावही तोच आहे. अर्थात कसल्याही प्रकारच्या पारलौकिक वा दुर्लभ श्रेयासाठी केला जाणारा हा यज्ञ नव्हे. ह्या यज्ञाने मरणोत्तर स्वर्ग वा मोक्ष मिळावयाचा नाही तर जे मानवी शक्यतेच्या कोटीत आहे त्याच्या प्राप्तीसाठी हा यज्ञ आहे. आणि हे साध्य करण्यासाठी स्वतःला जिंकायचे आहे. जिंकणे म्हणजे जे जिंकले जाते त्याचे निर्मूलन नव्हे. तर जे जिंकायचे त्याच्यावर स्वतःचा अधिकार प्रस्थापित करायचा. येथे 'सिर्येसिसची' पहिल्यापेक्षा अधिक वरच्या पातळीवरच्या एकत्रिकरणाची कल्पना अध्याहृत आहे. हे नवे एकत्रिकरण म्हणजे मागील घटकांची नव्या घटकांबरोबरची केवळ साधी बेरीज नसते. येथे फार मोठा गुणात्मक बदल घडून आलेला असतो. हे एक नवेच वास्तव जन्माला आलेले असते की ज्यात पूर्वीचे विसंवाद अधिक वरच्या स्तरावर सुसंवादात रूपांतरीत होत असतात.

तपस्थ्याचा आदर्श अनेक दृष्टीनी अस्विकारणीय ठरतो. एक तर हा आदर्श मनुष्याला Demoralize म्हणजे नैतिकदृष्टया खच्ची करतो. या आदर्शांत सहजप्रेरणांचा तिरस्कार शिकविण्यात येतो. तसेच पापासाठी शिक्षा व पुण्यासाठी बक्षीस अशा प्रकारच्या शिक्षा आणि बक्षिसाच्या तत्त्वावर त्यात नैतिक शिक्षण देण्यात येते. भीती हा या नीतीशास्त्राचा एकमेव मूलभूत आधार आहे. परमेश्वराच्या शिक्षेची भीती, या जन्मातल्या कर्मासाठी होऊ शकणारी पुढील जन्मातल्या शिक्षेची भीती. सहजप्रेरणांच्या तिरस्कारामुळे काही प्रेरणांच्या निरोधात दुसऱ्या काही प्रेरणांचे संवर्धन करण्याचा प्रयत्न येथे होतो. प्रेरणांचा अशा प्रकारचा निरोध अनैसर्गिक असतो.

आपल्या एकूण प्रगतीचा आढावा जर आपण घेतला तर आज आपल्या असे लक्षात येईल की पशुत्वामध्ये आयुष्याला प्रारंभ करून पशुत्वापासून खूप लांबची मजल आपण मारली आहे. आपण मनुष्य बनलो आहोत. मनुष्याच्या उत्क्रांतीच्या दृष्टीने हा खूपच मोठा पराक्रम आहे. परंतु आपण आणखी जे काही साध्य करू शकतो त्याच्या तुलनेत हा पराक्रम काहीच नाही. मात्र त्यासाठी आपणाला नवी वाट शोधून काढावी लागेल.

मनुष्याचे सामर्थ्य त्याच्या प्रेरणांच्या सामर्थ्यावर अवलंबून असते. परंतु प्रेरणा प्रबळ असल्या म्हणून ती व्यक्तीही प्रबळ असेल असे नव्हे. शिस्तबद्ध, संस्कारित प्रेरणांमुळे मनुष्य मोठा होतो. परंतु शिस्त व संस्कार म्हणजे निरोध नव्हे. निरोधाने मनुष्य मानसिकदृष्टया रोगट होतो. प्रेरणाना विपारी रूप येते.

तसा मनुष्य स्वतःचा व स्वतःबरोबरच उर्वरित सगळ्या जगाचा तिरस्कार आणि आणि द्वेष करू लागतो. म्हणून प्रेरणांचा सक्तीचा निरोध युक्त नाही. परंतु प्रेरणाना स्वैर वाव देणेही बरोबर नाही.

नित्शेचे नीतीशास्त्र पॉवरच्या संकल्पनेशी निगडीत आहे. ज्याच्या ठिकाणी पॉवरचे प्रमाण अधिक तो मोठा होण्याची शक्यता अधिक असे त्यांची विचार-सरणी सांगते. नित्शे 'गुड' आणि 'बॅड' ('उत्कृष्ट' आणि 'निकृष्ट') व 'गुड' आणि 'इव्हिल' असा भेद करतात. 'उत्कृष्ट आणि निकृष्ट' या प्रकारच्या नैतिक कल्पनातून आयुष्याचे मूल्यमापन करणारे ज्या दृष्टीने स्वतःकडे पाहातात त्याच्यापेक्षा अगदी वेगळ्या दृष्टीतून पाप आणि पुण्याच्या नैतिक कल्पनातून आयुष्याचे मूल्यमापन करणारे त्यांच्याकडे पाहातात. 'उत्कृष्ट' हे मूलतःच सामर्थ्यवान असल्याने व सामर्थ्य हे स्वभावतःच अनपेक्षित परिणामांचे म्हणून भीतीदायक असल्याने अ-सामर्थ्यवानाना 'इव्हिल' दुष्ट वाटतात. उलट सामर्थ्यवानाना अ-सामर्थ्यवान निकृष्ट वाटतात. असामर्थ्यवानाना सामर्थ्यवानही त्यांच्याच पंक्तीत येऊन बसावेत, म्हणजे तेसुद्धा असामर्थ्यवान व्हावेत असे वाटते. हे अर्थात त्याना अशक्यप्राय आहे. बहुसंख्य मनुष्यांच्या प्रेरणा बेताच्या शक्तीच्या असल्याने त्या त्याना कसलाही नैतिक प्रश्न निर्माण करीत नाहीत. उलट ज्यांच्या प्रेरणा प्रबळ असतात त्यांच्यापुढे फार मोठा नैतिक प्रश्न असतो. कारण या प्रेरणा आहारी आणण्यासाठी त्याना रात्रंदीन त्यांच्याशी युद्ध करावे लागते. प्रेरणा निर्बल असणारी मनुष्यें सामाजिकदृष्ट्या विचार करता बऱ्याच प्रमाणात अनाक्रमक म्हणून निरुपद्रवी असतात. या निरुपद्रवी लोकाना जगातल्या यच्चयावत सर्व लोकानी त्यांच्याचसारखे गरीब, अनाक्रमक बनावे असे वाटते. येथे अर्थात एक फार मोठी अडचण निर्माण होऊ शकते. कारण ज्यांच्या प्रेरणा मूलतःच बलवान आहेत ते लोक स्वभावतःच आक्रमक असतील. परंतु इतर अनाक्रमक पण संख्येने प्रचंड असणाऱ्याना जे जे आक्रमक ते ते स्वतःपेक्षा वेगळे व म्हणून भयंकर धोका-दाय वाटत असतात.

जगात अशा प्रकारे दोन अगदी वेगवेगळ्या प्रकारची मनुष्यें अस्तित्वात असल्याने या दोन प्रकारच्या लोकांचे जगण्याचे मार्गही तत्वतः भिन्न असतील. परंतु या दोन प्रकारच्या लोकाना एकत्र राहावे लागल्याने काही प्रश्न निर्माण होतील. अनाक्रमक लोकाना सर्वांनी अनाक्रमक बनावे असे वाटेल. तर आक्रमकांच्या दृष्टीने अनाक्रमकपणा हा कमकुवतपणा असेल. अर्थात अनाक्रमकांची संख्या प्रचंड असल्याने केवळ संख्येच्या जोरावर आक्रमकांवर अनाक्रमक मात करू शकतील. आक्रमकपणाला ते पाप ठरवू शकतील. पापाला परमेश्वर शिक्षा देतो किंवा या जन्मात जे जे काही आपण करू त्याचा मोबदला पुढील जन्मात मिळेल असे भीतीचे नीतीशास्त्र त्यांच्या मनावर बिंबवून त्यांचे ते खच्चीकरण घडवून

आणू शकतील. काही ना काही क्लृप्त्या लढवून अनाक्रमक आक्रमकाना त्यांच्या स्वभाविक शक्ती वापरण्यापासून परावृत्त करतील. त्याना स्वत:च्या समर्थतेबद्दल खंत वाटावयास लावतील. म्हणजेच शेवटी त्याना स्वत:चा स्वाभाविक विकास करून घेऊ देणार नाहीत.

काही लोकांच्या नैसर्गिक प्रेरणा व भूका अत्यंत प्रबल व तीव्र असतात. उलट बहुसंख्यांकांच्या त्याच प्रेरणा व भूका नि:सत्व आणि दुर्बल असतात. ज्यांच्या प्रेरणा कमकुवत असतात त्याना त्या प्रेरणा कह्यात ठेवणे फारसे कठीण पडत नाही. उलट ज्यांच्या प्रेरणा प्रबळ असतात त्याना ते फारच कठीण जाते. परंतु याच लोकाना पुढे काही ना काही उज्वल भवितव्य असू शकते. कारण त्यांचा आत्मसंघर्षसुद्धा त्यांच्या प्रेरणांइतकाच तीव्र असू शकतो आणि या आत्मसंघर्षातून काही ना काही उदात्त निष्पन्न होण्याची शक्यता असते. म्हणून प्रेरणांचे खच्चीकरण अयोग्य ठरते.

समजा, एका बापाला दोन मुलगे आहेत. त्यातील एक मुलगा अगदीच मिळमिळित आहे तर दुसरा वांड, आक्रमक आहे. पहिल्याला बापाची शिस्त पाळणे अजिबात जड जात नाही. कारण मुळातच तो नि:सत्व आहे. पण दुसरा मूलत:च आक्रमक असल्याने एक तर त्याच्या बापाला त्याला मारझोड करून वठणीवर आणावे लागेल किंवा स्वत:वर सोपवावे लागेल. मारझोड केल्याने कदाचित तो मुकाट्याने सरळ येईल. किंवा दुसऱ्या टोकाला जाऊन आणखिच वांड बनेल. यापैकी काही जरी घडले तरी त्या मुलाच्या आयुष्याच्या दृष्टीने अहितकारकच असेल. कारण या दोन्हीही प्रकारात तो मुलगा स्वत:सारखा होण्याऐवजी त्याच्या वडिलांसारखा होणार असतो. एकदा होकारात्मक अर्थाने. दुसऱ्यांदा नकारात्मक अर्थाने. कारण दोन्ही प्रकारात त्याची त्याच्या वडिलांबरोबरची एकरूपता अभंगच राहणार असते. आणि या एकरूपतेतून बाहेर पडल्यावाचून त्याला त्याचा खरा 'मी', खरा विकास, खरे प्रौढत्व गवसणार नसतो. समजा, त्याच्या वडिलांनी त्याला स्वत:वर सोपविले तर एकतर तो स्वैराचारी बनेल किंवा स्वत:च्या आयुष्याकडे अधिक गंभीरतेने पाहू लागेल आणि स्वत:च्या आयुष्याला स्वत:च शिस्त लावून आयुष्यात कोणीतरी 'मी' होईल. मानवी नैतिक विचारसरणीचा विचार करताना निदर्शेपुढे असणारा प्रश्न हा अशा प्रकारचा मनुष्याच्या खऱ्या 'मी' चा प्रश्न आहे.

वरील उदाहरणातील दोन्ही वेळची नीती ही भीतीवाचक नीती आहे. एकात भीतीने व्यक्ती पार दबून जाते. तर दुसऱ्यात त्याच भीतीने ती अकारण व नको तेव्हाही आक्रमक बनते. एकात आपल्या सगळ्या उग्र प्रेरणा स्वत:विरुद्ध बनतात. तर दुसऱ्यात त्याच प्रेरणा अन्यांविरुद्ध बनतात. निश्चित म्हणणे असे की माणसाच्या बाबतीत संस्कार हे भीतीपोटी





अनुक्रमणिका

होता कामा नयेत. माणसाची स्वविषयक जाणीव आपण इतकी विस्तृत केली पाहिजे की स्वतःच्या प्रेरणांचे खच्चीकरण वा विकृतीकरणही न करता, स्वत.च्या सगळ्या तीव्र प्रेरणा जशाच्या तशा सुरक्षित ठेवूनही तो अधिक समंजस ,अधिक सुसंस्कृत व अधिक उदात्त बनू शकावा. येथे नैतिक नियम कोठले पाळायचे हा प्रश्न महत्वाचा नाही. प्रस्थापित नैतिक नियमसुद्धा आपण पाळू शकतो. परंतु प्रथम त्या नैतिक नियमांच्या मागे जाऊन त्याना आधार देणारी जी अतिभौतिक किंवा धार्मिक वा आध्यात्मिक अबौद्धिक चौकट असते ती चौकट समजून घेऊन ते नीतिनियम आपण पाळू शकतो. म्हणजेच कोण्या काल्पनिक परमेश्वराला वा शक्तीला जबाबदार राहू न पाहाता स्वतःला जबाबदार राहूनही आपण आपले आयुष्य जगू शकतो.

पॉवर ( विल्–टू–पॉवर) ही मूल्यमापनाची नित्शेप्रणीत कसोटी आहे. आणि विल्–टू–पॉवरमुळे मानवाचा अतिमानव होऊ शकतो किंवा आदिमानव, नव्हे वानरही उलट होऊ शकतो. उन्नती आणि अवनती, प्रगती आणि परागती दोन्हीचे बीज विल्–टू–पॉवरमध्ये आहे. विल्–टू–पॉवरमध्ये बिघाड म्हणजे आत्म्याचे आजारपण. मानवजातीच्या आत्मऱ्हासाचा प्रारंभ. उत्क्रांतीला तडा.

उत्क्रांत होणे म्हणजे पुढचे स्थित्यंतर घडून येणे. प्रत्येक स्थित्यंतर म्हणजे अधिक सुधारणा किंवा प्रगतीच असेल असे नाही. कारण निसर्गाला ( आपल्या प्रबंधाप्रमाणे विल्-टू-पॉवरला ) प्रगती आणि परागती या प्रकारचा वैचारिक फरक समजत नाही. हा फरक माणसाला कळतो. म्हणून या स्थितीनंतरची पुढील स्थिती माणसाने स्वेच्छापूर्वक इच्छायची आहे. उत्क्रांतीप्रक्रियेत वानराचा नर झाला. या नराचा जर आता महामानव व्हायचा असेल तर त्यासाठी विल्–टू–पॉवरला तशी कलाटणी देता आली पाहिजे. विल्–टू–पॉवर हाच सर्व प्रगतीचा आदि आणि अंत आहे.

नित्शे जेंव्हा कोठल्याही प्रश्नाचा विचार करतात तेव्हा ते त्या प्रश्नाच्या मुळाशीच नव्हे तर त्या प्रश्नाच्या अगदी पलिकडे जावून विचार करतात. नैतिकशास्त्राचा विचारदेखिल त्यानी त्याच प्रकारे केला आहे. नैतिक शास्त्रांचा विचार करताना त्यानी तत्कालिन जर्मन नीतीशास्त्र पारंपरिक ख्रिस्ती नीतीशास्त्र आणि प्राचीन ग्रीक व हिब्रू नीतीशास्त्रे या चार नीती-शास्त्रांचा एकत्रित विचार केला. या विचारानंतर ते या निष्कर्षाला आले की कोठलिही नीती स्थलकालातीत असत नाही. स्थलकालातीत वस्तुनिष्ट किंवा नीतीसाठी नीती असा काहीही प्रकार जगात अस्तित्वात नाही. प्रत्येक जमातीची नीती वेगळी असते. आणि बऱ्यावाईटाच्या, न्यायान्यायाच्या त्या विशिष्ट कल्पना त्या त्या समाजाने सोयीनुसार विकसित केलेल्या आहेत. जीवनाच्या लढाईत टिकून राहाण्यासाठी व विजयी होण्यासाठी ज्या प्रकारचे आचारविचार त्या



अनुक्रमणिका

समाजाला सोयीस्कर वाटले त्या आचारविचाराना त्या समाजाने नीती मानले. तेव्हा प्रत्येक समाजाची स्वतःची अशी नीतीविषयक एकएक प्राथमिक गृहित चौकट असते. या चौकटीचा व प्रत्यक्ष जगाच्या रीतीभातीचा काहीही आंतरिक संबंध नसतो. म्हणजेच ही चौकट arbitrary किंवा आम्ही म्हणतो म्हणून अशा प्रकारची असते. मात्र तसे असले तरी त्या त्या समाजाचा प्रत्येक घटक बाहेरच्या जगात जे जे नैतिक व धार्मिक अर्थ पहातो ते ते सर्व अर्थ त्या चौकटीने नियंत्रित केलेले असतात. केवळ बाहेरचे जगच अशा प्रकारे त्या चौकटीतून तेथला माणूस पाहातो असे नसून स्वतःकडेही तो त्याच चौकटीतून पाहातो. परिणामतः त्याला आपले पाहाणे सापेक्ष आहे, ते निरपेक्ष, निरपवाद नाही हेही कळू शकत नाही. समाजाला ज्या कृती चालवून घ्याव्याशा वाटतात त्या कृती समाज चालवून घेतो. बाकिच्यांचा निषेध करतो. नको असलेले आचारविचार अशा प्रकारे हळूहळू गळत जातात. आणि नवे समाजमान्य आचारविचार त्यांची जागा घेतात. अशा प्रकारे प्रत्येक नीती बदलत असते. परंतु त्या नीतीमागची अबोध गृहित चौकट मात्र न बदलता तशीच टिकून राहाते. जोवर ही चौकट बदलत नाही तोवर माणूसही बदलणार नसतो. कारण या चौकटींच्या अपरिवर्तनीय चष्म्यातून जग, इतर माणसे, त्या माणसांचे इतरांबरोबरचे व स्वतः-बरोबरचे संबंध प्रत्येकजण पाहात असल्याने हे संबंध कधीही जसे खरोखर असतात तसे ध्यानात येऊ शकत नाहीत.

नीतीशास्त्रे अशा प्रकारे सापेक्ष आहेत. परंतु ती सापेक्ष आहेत व असू शकतात ही वस्तुस्थितीच कोणी उघडपणे कबूल करत नाही. सारांश, नीतीवाचक मूळ अबोध तात्विक बैठकींचा व गृहित कृत्यांचाच कोणी संशय घेऊ इच्छित नाही. दुसरी गोष्ट अशी की जितक्या दृष्टी तितक्या सृष्टी अशी मनुष्याची परिस्थिती असल्याने ज्याला 'वस्तुनिष्ट' किंवा त्रिकालाबाधित सत्य म्हणतात तसले कसले त्रिकालाबाधित सत्यही मनुष्याला शोधून काढणे जमणार नाही. कारण असे सत्य शोधून काढण्यासाठी वा तशा प्रकारचा निर्णय ठरविण्यासाठी ज्या बौद्धिक सोयी असाव्या लागतील त्याच मनुष्यापाशी नाहीत हेही मनुष्ये कबूल करू इच्छित नाहीत. मनुष्यानी जर हे कबूल केले असते तर त्यांच्या हेही ध्यानात आले असते की आपण ज्याना घटिते म्हणतो तो खरोखर घटिते (फॅक्ट् स) नसून ती अन्वेषणे आहेत. अन्वेषण आणि मूळ घटित यांची परस्पराशी तुलना करून घटितांच्या अन्वेषणाची खात्री करून घेण्याचे एकही साधन मनुष्यापाशी नाही.

(क्रमशः)



